पुस्तकत्रयांपैकीं पहिलें बक्षीस.

श्री

# भक्तिकल्पलता.

लेखक,

श्रीयुत दत्तात्रय अनंत आपटे, रा०—खेड.

प्रकाशक,

श्रीयुत लोकमित्रकर्ते, रा०—खानापूर.

खानापूर "धनंजय" छापखाना.

सन १९०२ इ०

## ॥ श्री लक्ष्मीवेंकटेशायनमः ॥



श्लोक.

जिव्हे कीर्तय केशवं मुररिपुं चेतो भज श्रीधरं ।
पाणिद्वंद्व समर्चयाऽच्युतकथां श्रोत्रद्वय त्वं शृणु ।
कृष्णं लोकय लोचनद्वय हरेर्गच्छांघ्रि युग्मालयं ।
जिघ्र घ्राण मुकुंदपादतुलशीं मूर्धन्नमाधोक्षजं ॥

हे जिव्हे, तू केशवाचें कीर्तन कर, हे मना, तूं मुरारि जो श्रीकृष्ण त्याचें चिंतन कर, हे हस्तद्वयानो, तुम्ही श्रीधराची पूजा करा, कर्ण द्वो, तुम्ही अच्युतकथा श्रवण करा, नेत्रानो, तुम्ही कृष्णास अवलोकन करा, हे चरणद्वया, तू हरिमंदिराप्रत जा, हे घ्राणेंद्रिया, तूं मुकुंदपादसंबंधीं तुलशीचें अवघ्राण कर, हे मस्तका, तूं अधोक्षजास **नमस्कार** कर.

# प्रकाशकांचें हृद्गत.

मूकं करोति वाचालं पंगुं लंघयते गिरिम् ॥
यत्कृपा तमहं वन्दे परमानन्द माधवम् ॥

श्रीमद्भगवद्गीता.

प्रापंचिक व्यवहारामध्यें मनुष्याच्या अंतःकरणांस ईश्वर प्राप्तीरूप अखंड सुख प्राप्त होऊन जीवित्वाचें खरें सार्थक्य करण्यास भक्तीसारखा दुसरा सुलभ मार्गच नाहीं, असें ह्मटलें असतां अतिशयोक्ति होणार नाहीं. परमेश्वर-प्राप्तीस इतर ज्ञान, कर्मादि मार्ग यावन्मनुष्यमात्रास जसे विरोधी आहेत, तसा हा भक्तिमार्ग नसून सर्वत्र लहान थोरास अविरोधी असा आहे. हें महान् भगवद्भक्त तुकारामादिक जे झाले त्यांच्याच चरित्रावरून सर्वांस विदित आहेच. तर अशारीतीचा हा सुलभ मार्ग ज्यांत दाखविला आहे, असा हा **भक्तिकल्पलता** नामक ग्रंथ मुमुक्षुजन कल्याणार्थ प्रसिद्ध श्री **चंद्रिरामस्वामी** यानीं परिश्रमानें तयारकेलेला, तो आह्मीं आमच्या प्रिय वाचकांकरितां देत आहों, हा मूळ ग्रंथ संस्कृत असून त्याचें यथामति भाषांतर आमचे परम मित्रश्रेष्ठ **दत्तात्रय अनंत आपटे** ( चंद्रिराम चरित्रादि पुस्तकाचे कर्ते ) रा० खेड यांनीं तयार करून दिलें असल्यानें अशा प्रसंगी त्यांचे अनंत आभार मानणें इष्ट आहे. असें योग्यतेचें ' ( जीवित्वाचें खरें कर्तव्य दाखविणारें ) पुस्तक स्वतःच्या नफ्या-तोट्याकडे बिलकुल लक्ष न देतां, केवळ लोकमित्राच्या-आश्रय

दात्यांचीं अंतःकरणें भगवच्चरणारविन्दी लागावीं व त्या पासून त्यांचें खरें कल्याण व्हावें इतकीच इच्छा बाळगून अर्पण करीत आहों तरी अशाच योग्यतेचीं पुस्तकें मित्रास सालोसालीं देतां यावींत अशी त्यास उमेद आणणार व अल्प दोषांची क्षमा करून योग्य सुधारणा करविणार आपण सूज्ञ वाचक समर्थ आहां.

सर्वांचा कृपाकांक्षी नम्र.

( प्रकाशक ) डी. जी. सडेकर.

☞ सूचना—या ग्रंथात नजरचुकीने मूळ श्लोकांत वगैरे बरीच अशुद्धे राहिल्याचें मागाहून आढळून आलें पण त्याचें शुद्धिपत्र देण्यास सवड नसल्यामुळें वाचकांनीच वाचतेवेळीं दुरुस्ति करावी अशी विज्ञप्ति आहे. प्रकाशक.



# अर्पण-पत्रिका.

श्रीमद्गुणधीमंता त्वत्पद वंदन करूनियां आधीं ।
ग्रंथार्पण हें करतों निज दातृत्वें सरो मदीयाधी ॥ १ ॥

मंतू किमपि न चित्तीं आणितां धरिला सुमार्ग सोपान ।
ऊंचाया कीर्तिगिरी झाला मज पंगुसींच सोपान ॥ २ ॥

तमनिर्धनता जाया धनिक रवी मजसि आज सांपडला ।
संचित पुण्यबलानें निर्धन करिं परिस हो जसा पडला ॥ ३ ॥

बालक आर्त्त बघोनी जननीचें सुमन जेंवि कळकळतें ।
तैसें त्वन्मन सखया बघुनि मला होत हें विकळ कळतें । ४ ।

पूर्णत्वासी न्यावें निजसुदयें या मदीय हेतूतें ।
बलवंता उचलाया जड न अणु सांग केंवि हें तूतें ॥ ५ ॥

साक्षेपें घन बघुनी चातक सद्भक्ति अर्पि तोयातें ।
तो ही स्वीकृत करितो, स्वीकारा तेंवि अर्पितों यातें ॥ ६ ॥

हे रसिकवरा रत्ना, तुजपुढती हें पडेल तें लटिकें ।
सत्काव्याज्यप्राशनि रसने पुढती कसेंहि तेल टिकें ॥ ७ ॥

बहु मोदें परि सान्या वस्तू प्रभु सान्या समहासि हे धरती ।
सुगुणागुण नच बघतां त्यांच्यावरि ठेविती खरी सु-रती । ८ ।

**ख**चुनी सप्तादश हीं भक्तिसुमें सुमणिंची नवी कंठी ।
अत्यादरपूर्वक म्यां अर्पियली ती विराजवी कंठीं ॥ ९ ॥

**रा**हुग्रस्तेंदु समा दुःखद बहु दुर्धर स्थिती मम ही ।
दूर करा कीर्तिवरा निजनामें दणाणवा सु-मही ॥ १०

**ड**मरुधर शंकर तो देवो सद्बुद्धि ही तुम्हां राया ।
सत्कृत्यें करुनि सदा केलें ऋणि आपुलेंचि मा-राया ॥ ११ ॥

**क**रुनि दया दीन जनीं घ्यावें काढूनि यांतलें सार ।
तिक्ताम्लयुक्त जैसें लागे रुचकर सुजेमनीं सार ॥ १२ ॥

**र**क्षी सदत्र सर्वां, होउनि विघ्न नच अविद्य कां मारी ।
सुज्ञाज्ञाना तैसें रक्षितसो शिव करील कामारी ॥ १३ ॥

**वि**नय भरित परि लाघवि परिसुनि हे सतत बोल कानाहीं ।
विटलों असाल स्वमनीं मजसम हि वदाल बोलका नाहीं ।१४

**ज**नुज्याचा केवळ तो दीनजनार्थेचि तयासि वानावें ।
हेतू मदीय इतुका कोरावीं हृदय-पाषिं तीं नावें ॥ १५ ॥

**यो**गीश्वर हरिदेवो, पूर्णायु करो तसा सदा विजय ।
यदुरायें पूर्ण दयें धर्मानुज तारिला जसा विजय ॥ १६ ॥

**स्तु**त्याई असा म्हणुनी मंजुल सुस्वाद गोड आर्यानीं ।
केली चरणीं विनती, घ्यावी ही मान्य करुनि आर्यांनीं ।१७।

मुक्काम खेड,
ता. २९ आगष्ट १९०२

आपला नम्र सेवक,
दत्तात्रय अनंत आपटे.

# मुख-प्रबंध.

प्रिय वाचकहो ! प्रस्तुत आपणांपुढें असलेला हा **श्रीभक्तिकल्पलता** नांवाचा ग्रंथ, नगर पुणें वगैरे भागांत प्रसिद्ध होऊन गेलेले साधुवर्य **श्रीचंडिराम**महाराज यांचा कृपाप्रसाद होय. दोन तीन वर्षां पूर्वी जेव्हां सद्गुरू महाराजांचे चरित्ररूपानें गुणानुवाद गाण्याचा प्रसंग आला होता त्यासमयीं पुढें अशा रीतीनें महाराजांची आणि तद्द्वारां अंशतः आपणां महाराप्रियांची पुन्हां कांहीं सेवा घडण्याचें नशीबीं येईल असें या लेखकाच्या स्वप्नींही नव्हतें. कारण **श्रीचंडिराम**महाराजांनीं ग्रंथ लेखनद्वारां ह्या जगतावर अनुग्रह करून ठेविला आहे असं नुसतें जरी ऐकिवांत होतें तरी ते ग्रंथ उपलब्ध होतीलच अशी खात्री नव्हती. परंतु आपल्या सुदैवानें ते ग्रंथही अल्प आयासांनींच प्राप्त झाले. मग त्या ग्रंथांची अज्ञातवासाची मुदत संपली ह्मणा कींवा त्यांच्या प्रकाशनास हाच काळ उक्त आहे अशी गुरूमहाराजांची इच्छा होती न कळे ! असो.

प्रथम **श्रीभक्तिकल्पलता** हा ग्रंथ येथील **श्रीचंडिराम**मठाधिपति वे० शा० संपन्न **रंगशास्त्री** याच्या कृपेनें मिळाला. ग्रंथ मिळण्यापूर्वी तो आपण लागलींच प्रसिद्ध करूं वगैरे मनांत बऱ्याच उड्या चालल्या होत्या पण ग्रंथ घेऊन पाहतों तों तो महाराजांनीं आपल्या प्रासादिक गीर्वाण भाषेंत लिहिलेला ! आणि आमचें त्या भाषेचें ज्ञान ह्मणजे आधुनिक शिक्षणपद्धतीनें झालेलें तुटपुंजें ! **श्रीचंडिराम**महाराजांसारख्या अधिकारी पुरुषाचें हातून

एकंदर जनसमूहास अत्यंत उपयोगी असा भक्तिमार्गपर लिहिला गेलेला ग्रंथ अशा या धर्मक्रांतीचे वेळीं प्रसिद्ध करण्याची प्रबळ इच्छा एकीकडे आणि ही भाषेसंबंधाची अडचण एकीकडे! अशी मोठी घोटाळ्याची स्थिती उत्पन्न झाली. ग्रंथ जशाचा तसाच संस्कृतमध्यें प्रसिद्ध करावा तर त्यापासून महाराष्ट्र जनसमूहास तादृश असा काय फायदा होणार! आणि पोथीस पुन्हां जशीच्या तशीच गांठ मारून ठेवावी तर तेंही गौणच! शेवटीं काय असेल तें असो ग्रंथांतील एक एक श्लोक घेऊन त्यावरील सद्गुरू महाराजांच्या विस्तृत टीकेस एकाग्र चित्तानें वाचावयास आरंभ केला. श्लोक थोडासा कळल्यासारखा वाटल्या-वरून, त्याचा मथितार्थ आपल्या महाराष्ट्र भाषेंत लिहून काढला. पुढें अडचण काय येईल याचा विचार न करितां दुसरा व त्याचे मागून तिसरा अशीं एकेका श्लोकाची व्यवस्था लावीत गेलों. पण चमत्कार हा कीं, पुढें जस-जसा मार्ग आक्रमित गेलों तसतसा ग्रंथ सुलभतर वाटत गेला. कारण उघड आहे:—

नातरी जें धातुवादा ही न जोडे। तें लोहींची
पंधरें सांपडे॥ जरी दैवयोगें चडे। परिस हातां।१।
तैसी सद्गुरू कृपा होये। तरि करितां काय आपुनो हे?

ज्ञानराज.

सद्गुरू कृपा प्राप्त झाली असतां प्रयत्न करणारांला काय साध्य होणार नाहीं? परीस हातीं आला असतां किमियागारासही अप्राप्य असें पंधरा दराचें सर्वोत्कृष्ट सोनें लोखंडापासूनच मिळूं शकतें! असो;

या भक्तिकल्पलता ग्रंथाचे उपसंहारासह एकंदर सत्रा परिच्छेद पाडिले आहेत. त्या सर्वांतून भक्तियोग व ज्ञानयोग, भक्ति व मुक्ति, भक्त व ज्ञानी वगैरे अनेक विषयांचा मोठ्या मार्मीकतेनें ऊहापोह करून ईश्वरप्राप्तीचे सर्व मार्गांत भक्तियोगाचें वर्चस्व अनेक कारणें दाखवून प्रस्थापित केलें आहे. प्रथम इतर साधनास जितके प्रयास आणि अडचणी सोसाव्या लागतात तितक्या भक्तीस लागत नाहींत. म्हणजे मनुष्यास भक्ति करणें फार सुलभ आहे. कारण "देव भक्ति भावाचा भुकेला" हें या मार्गांतील मुख्य तत्व आहे मग तेथें स्त्री, शूद्र, लहान थोर असा भिन्नभाव नाहीं.–

हें सांगावें काय किरिटी। तुवांचि देखिलें आपुलिया दिठी॥ मी सुदामयाचिया सोडी गांठी। पव्हयां साठीं॥ १ ॥ पैं भक्ती मी एकी जाणें। तेथ सानें थोर न म्हणे। आम्ही भावाचे पाहुणे। भलते या॥ २ ॥ येर पत्र पुष्प फळ। हें भजावया मिस केवळ॥ वांचूनि आमुचियां लागीं निष्फळ। भक्ति तत्व॥ ३ ॥

—श्री ज्ञानेश्वरी—

दुसरें भक्तीस देशकालाचा प्रतिबंध नाहीं. योगमार्गाची किंवा कर्ममार्गाची गोष्ट अशी नाहीं. त्यांत थोडी चूक झाली कीं सर्व व्यर्थ. भक्तिमार्ग विशेष सोइस्कर वाटण्यास तिसरें कारण असें आहे कीं, भक्तीचे योगेंकरून प्रपंच नेटका करून परमार्थही साधतां येतो. अर्जुन, परिक्षित, एकनाथ, तुकोबा, नामदेव, जनाबाई, गोरा-

कुंभार, सावतामाळी आदिकरून भगवद्भक्तांचे चरित्राकडे अवलोकन केलें असता वरील विधानांची सत्यता दिसून येणार आहे. त्याच्या वेगवेगळ्या प्रकारच्या भक्तीत देश काल स्त्री-शूद्र भेद किंवा प्रपंच यांपैकी कांहीही आडवीं आलीं नाहीत. नाथांनीं स्पष्ट आपला अभिप्राय दिला आहे:—

**माझा भावार्थ जेथें होय । तेथें मी जाती कुळीं न पाहें ॥ मी भावाचेनी लवलाहें । वश्य होय निजभक्तां ॥ ११७ ॥ मजमध्यें रंगली चित्त-वृत्ति । या लागी विसरला गृहासक्ति ॥ त्यासी गृहस्थाश्रमीच माझी प्राप्ति । निश्चयें जाण उद्धवा ॥ ११८ ॥**

—एकनाथी भागवत अ १७—

शिवाय भक्तलोकाविषयीं ध्यानांत ठेवण्यासारखी आणखी एक गोष्ट अशी आहे की, त्यांना कोणत्याही प्रकारचा विधिनिषेध नाहीं. त्यांना सर्व प्रकारच्या धार्मिक सवलती मिळालेल्या असतात. प्रमादवशात् जरी त्याचे हातून निषिद्धाचरण घडलें तरी त्या पापाचें निवारण परमेश्वरास स्वतः होऊन करावें लागतें. अशा रीतीनें भक्तिमार्गाची इतर मार्गांहून श्रेष्टता स्थापीत करून पुढें भक्तजनाना मुक्तीपेक्षांही भक्तींत एकप्रकारचें विशेष सौख्य वाटतें हें अनेक दृष्टांत देऊन वर्णिलें आहे.

या ग्रंथाचें दुसरें मुख्य स्वरूप ह्मणजे त्यांतील पाखंड-खंडण हा भाग होय. शङ्कावाद्याचे प्रतिमापूजनावर किंवा इतर कर्माचरणावर जे नेहमी तर्क वितर्क निघत असतात त्या सर्वांचें या भागांत विस्तारपूर्वक निरसन केलें आहे.

हें दुर्घट काम तडीस जाऊन हा सुदीन प्राप्त झाला आहे त्या सच्चिदानंद मूर्तीस लीन होऊन हा बराच लांबलेला प्रास्ताविक लेख येथें पुरा करतों.

मुक्काम खेड जि० पुणें.
तारीख २९ आगष्ट १९०२ इ.

सर्वांचा नम्र सेवक
**दत्तात्रय अनंत आपटे**



॥ श्री ॥

# भक्ति-कल्पलता.

## प्रकरण पहिलें.

## ईश-स्तव.

**श्रीगणेशायनमः । श्रीसरस्वत्यैनमः । श्रीगुरुभ्योनमः ॥**

**श्रीकृष्णायनमस्तस्मै सच्चिदानन्दमूर्तये ।**
**सर्वज्ञः सर्वशक्तिर्यो यस्मिन्भात्यखिलं जगत ॥ १ ॥**

अखिलविघ्नहर्ता, मंगलमूर्ति, ज्यास विघ्नराज असेंही ह्मणतात त्या गणराजाप्रत नमस्कार असो त्याचप्रमाणें सकलबुद्धिप्रकाशास विकासितकरणारी जी शारदा वाणी तिचाही अनुग्रह प्राप्तकरून घेण्यास तिला साष्टांगप्रणिपात केलापाहिजे. पण इतकें करण्यापेक्षां सकलाधिष्ठानमूर्ति जो श्रीकृष्णपरमात्मा त्यासच एकदम शरण गेलें ह्मणजे सर्व कार्यसिद्धि सहजच होईल. कारण गणेश-शारदा-गुर्वादिमध्यें ज्या विघ्नहरण, बुद्धिप्रकाशन वगैरे शक्ति आहेत त्या सर्वच त्याचेठायी पूर्णत्वेंकरून वास करीत आहेत. हें सर्व चराचर जग त्याच सर्वाधिष्ठानमूर्तिचे ठायी प्रकाशमान झालेलें आहे. सर्व भूतांच्या अंतःकरणां-

मध्यें तोच वास करीत असल्याकारणानें त्यास प्राण्यांचीं सकल कृत्यें समजतात, आणि ह्मणूनच त्यास सर्वज्ञ असें ह्मटलें आहे. तसेंच कालत्रयाबाधित, कैवल्यप्रद अशी सच्चिदानंदमूर्ति ती तोच होय.

**य एको निर्गुणोऽनन्तश्चिन्मात्रोऽपि स्वमायया ।**
**स्वयमेव जगद्भूत्वा तस्मिन् जीवात्मनाविशत् ॥ २ ॥**

आणखी तो परमात्मा कसा आहे ह्मणाल तर, तो एक आहे, ह्मणजे सजातीय विजातीय हा भद त्याला मुळींच लागू नाहीं. तो रजतमोगुणादि संबंधरहित असा निर्गुण असून अनंत देशकालेंकरूनही त्याचा अंत लागणें नाहीं. तर मग त्या चिन्मात्रास ओळखावें कसें? तो एक ह्मणजे अद्वितीय असा जर आहे तर मग हें जग त्यापासून भिन्न अर्थात् द्वैतरूप झालें नाहीं काय? नाहीं. आपल्या मायेच्या योगेंकरून, हें सर्व जगत् आपणच निर्माणकरून अथवा त्याचा आकार स्वतःच धारण करून त्यामध्यें प्रत्यक्ष तोच परमात्मा जीवात्म्याच रूपानें प्रविष्ट झालेला आहे, असें सर्वच जर एकाकार आहे तर मग द्वैत तें कोठें राहिलें? आतां पुन्हा त्याचें उज्वल स्वरूप न दिसण्याचें कारण ही मायाच—

**यं न पश्यंत्यमी जीवाः पश्यन्तमपि मायिनम् ।**
**योगैश्वर्यमिदं यस्य ह्यचिन्त्यरचनात्मकम् ॥ ३ ॥**

आपणा सर्व प्राणिमात्रांचे अंतर्यामीं निरंतर वासकरणारा परमात्मा आपल्या अगदीं सान्निध असतां आपणास त्याचें यथार्थ स्वरूपज्ञान न व्हावें यास त्याचें योगैश्वर्य कारण

होय. श्री गीतेंत कृष्णपरमात्म्यानेंच स्वतः ह्मटलें आहे कीं, " अज आणि अव्यय असा जो मी योगमायेमध्यें गुरफटलेलों आहे त्या मला अज्ञ लोक वगैरे कारणावरून ओळखूं शकत नाहींत. अर्जुना, भूत, भविष्य आणि वर्तमान यांहीकरून मी अबाधित आहे हें तुझ्या पूर्णपणें लक्षांत असूंदे. " बरें पण या स्वरूपज्ञानापासून फलप्राप्ति ती कोणती ?

**यदज्ञानादिदं विश्वं सत्यवद्भाति दारुणम् ।**
**यस्मिन् ज्ञाते जगन्नास्ति गुरोश्चरणसेवया ॥ ४ ॥**

स्वरूपज्ञानापासून फलप्राप्ति नाहीं तर दुसरी कोणती तरी खरी फलप्राप्ति असूं शकणार आहे काय ? जगांत येऊन जें साध्य करून घ्यावयाचें तें हेंच तर आहे. हें स्वरूपज्ञान एकदां झालें ह्मणजे " जग सत्य आहे " ह्या अज्ञानवृक्षाच्या मूळावरच प्रथम कुऱ्हाडीचा घाय बसून " मायामयं जगत्सर्वं " ह्या सिद्धान्ताची ओळख पटूं लागते. मग ह्या महत्त्वाचा लाभ करून घेण्यास साधन काय ह्मणाल तर गुरुकृपा हें होय. निर्मलान्तःकरणानें ब्रह्मनिष्ठ अशा सद्गुरूची चरणसेवा करून तत्प्रसादानें निर्विकल्प असें समाधिसुख अनुभवतां येऊं लागलें ह्मणजे जगाच्या मिथ्यत्वाचा प्रत्यय येऊं लागतो, व ' सर्व मिथ्या आहे ' याबद्दल लागलीच खात्री होते. आतां ह्या अनुपम्य अशा समाधिसुखाचा लाभ सर्वांनांच प्राप्त होतो असें थोडेंच आहे. पण समाधिज्ञान हें कांहीं एकच ईश्वरप्राप्तीचें साधन नाहीं, प्रयत्नकरील त्यास हजारों मार्ग आहेत; निर्मलांतःकरणानें भजनपूजनकरणें तर दुर्घट नाहीं ना ?

यदात्मकमिदं विश्वं यदधीनं च सर्वशः ।
न तं भजन्ति ये मूढास्ते मज्जन्ति भवार्णवे । ५ ।

हें अखिल विश्व ह्मणजे ज्याचें स्वरूप असून त्यावरील सर्व स्थावरजंगमात्मक वस्तुही ज्याच्याच अधीन आहेत असा सर्वपूज्य परमकृपाळू कृष्णपरमात्मा त्याचें जे सारासार विचारशून्य मूढ लोक भजनपूजन करीत नाहींत त्यांचें दुर्दैव किती वर्णावें! मरणोत्तर यमपुरींत त्यानां एकदांच यातना भोगाव्या लागतात असें नाहीं तर नानायोनींमध्येंही प्रवेशकरून अनंतकालपावेतों जन्ममरणक्लेश त्यानां सोसावे लागतात! उलटपक्षीं, जे अहर्निश एकभावेंकरून त्याचें धवळ-यश गातात त्यांनाही त्यांस अनुरूप असेंच फल मिळतें.

सदाचाररता ये तु भवभीताः सुमेधसः ।
स्वपदं शरणं यातास्तदर्थं जगदीश्वरः ॥ ६ ॥

सदाचरण हाच ज्यांचा सर्वोत्तम धर्म त्यांना जगदीश्वरावांचून दुसरा कोण पाठिंबा असूं शकणार आहे ? तन मन धन सर्व त्यांचें सदाचारांत गेलें असल्यामुळें अर्थातच संसाराविषयीं त्यांचें मन अगदीं उद्विग्न होऊन गेलेलें असतें. ते आपल्या सर्वस्वासह त्याला मनोभावें करून वाहून घेतात आणि ह्मणूनच मग त्या करुणाघनाळा त्यांच्या परित्राणार्थ सत्वर प्राप्त व्हावें लागतें.

लीलाविग्रहवान् कृष्णो ह्यवतीर्णोऽप्यजोऽजया ।
स्वागण्यपुण्यगाथाभिः सेवकांस्त्रायतेऽनिशम् ॥ ७ ॥

परंतु परमात्मा हा अज ह्मणजे उत्पत्तिविनाशशून्य असा

असतांना भूतलावर अवतीर्ण तो कसा होतो? तर हें कांहि नव्यानें सांगावयास नको आहे. याचा अनुभव आपणास हवा तितका आलेला आहे. प्रसंग प्राप्त झाला असतां तो तात्काळ विग्रहवान ह्मणजे मानवदेह धारण करून भक्तजनांच्या वासना परिपूर्ण करतो. श्री गीतेंत ह्मटलें आहे—

परित्राणाय साधूनां विनाशायचदुष्कृताम् ।
धर्मसंस्थापनार्थाय संभवामि युगे युगे ।

आपल्या बऱ्याकरितां इतकी काळजी वाहणारा जो परमेश्वर त्यास विसरणें हा केवढा दोष आहे बरें?

यंभजन्त्यपि सर्वज्ञाःसनकाद्याश्च मुनीश्वराः ।
यस्य भक्ति विना मुक्तिर्दुर्लभा विदुपामपि । ८ ।

अहो! सनक, व्यास, वाल्मिक, नारदादिकरून सकल ब्रह्मनिष्ठानां—की ज्याना जगदुत्पत्तिमारख्या सर्व अज्ञेय गोष्टींचेंही—पूर्णज्ञान झालेलें होतें त्याना देखील जर तादात्म्यतेप्रत पोहोंचण्यास श्रवण कीर्तनादि उपायाचा अवलंब करावा लागला तर मग आपणासारिख्या अज्ञजनाची कथाही काय? ह्मणून ज्याअर्थी सर्वज्ञांना देखील मुक्ति ही भक्तिवांचून दुर्लभ झाली त्याअर्थी आपल्याला तीच साध्य करून घेतली पाहिजे.

प्रतिश्लोकमबद्धं हि यद्यशोवर्णनं तथा ।
नामानुकीर्तनं चापि परमं पावनं नृणाम् ॥ ९ ॥

आतां कोणी अशी शंका काढतील कीं, आह्मीं अज्ञानीं

आहेत. आमचेपाशीं त्याचे गुणानुवाद गाण्यास योग्य अशी शब्दसामुग्री नाहीं. अशुद्ध अशा आमच्या वाणीनें आह्मी त्या जगत्पालकाचें मन रिझवावें तें कसें? पण याबद्दल मळी काळजी नको. ईश्वर हा भावाचा भुकेला आहे. वाल्याकोळ्याची ताठ जीभ "**राम राम**" अशीं सुंदर नांवं घेण्यास वळेना ह्मणून "**मरा मरा**" अशींच अक्षरें जपत तो बसला तरी पुढें आपल्या एकनिष्ठ भावाच्यायोगेंकरून "वाल्मिकी" या सर्वविश्रुत नावास तोच पोहोंचला नाहीं काय? ह्मणून एकभावेंकरून त्याचें यथामति भजन करणें हें स्नानसंध्यादिकांपेक्षांही परमपवित्र आहे. यासाठीं ही एकविध भक्ति तुह्मास इष्टस्थलाप्रत नेण्यास पुरेशी आहे. मागें **पां**डव होऊन गेले; अलिकडे **नाम**देव तुकारामादि होऊन गेले. हे थोडेंच कांहीं जपजाप्यादि अनुष्ठानें करीत होते! त्यानां तरून जाण्यास केवळ त्यांची पराभक्तिच कारण झाली. आणि खरोखर या उपायासारखा सुलभ असा दुसरा कोणताच उपाय नाहीं.

अशाप्रकारें थोडा ईशमहिमा वर्णन करून प्रस्तुत ग्रंथाचे स्वरूपाकडें वळूं.

---

## प्रकरण दुसरें.

## ग्रंथस्वरूप.

**तस्य विष्णोः प्रसादार्थ माश्रित्य श्रीगुरोः पदम् ।**
**वितन्यते मया सम्यग्भक्तिकल्पलताधुना ॥ १० ॥**

एकंदरींत भक्तिचा महिमा असा मोठा आहे. व्यास, वाल्मिकींसारख्या महर्षींनांदेखील जर याची महती कोणत्याहीप्रकारें कमी वाटली नाहीं तर या भक्तिमार्गास कोण गौण लेखणार आहे? आणि आता ही जी "भक्तिकल्पलता" नांवाची वेल संतसज्जनरूपी सुंदर मंटपावर पसरावयाची आहे याचें कारणही हेंच आहे कीं, त्या कल्पलतेच्या सुमनोहर भक्तिकुसुमांचा परिमल स्वतःस मिळून इतर गर्जु भाविकमंडळीस देखील त्याचा लाभ व्हावा. बाकी हें काम स्वल्पातलें आहे असें मात्र नाहीं. तें सिद्धिस जाणें हें केवळ प्रयत्न करणाराचे हातातलें नसून त्यास पुष्कळांच्या सहाय्याची जरूरी आहे- तरी पण प्रथमारंभींच हताश न होतां कर्ता करविता एक तो परात्पर दीन बंधूच आहे हें मनांत पक्कें बागवून सर्वतोपरी त्याच्याच इच्छेवर अवलंबून आपणास पुढें चाललें पाहिजे.

**द्रवचित्तालवाला च प्रेमबीजसमुद्भवा ।**
**रत्यङ्कुरा महत्संगसत्कथामृतजीवना ॥ ११ ॥**

या 'भक्तिकल्पलते' चीं भक्तिकुसुमें सुमनोहर तर खरींच, पण तिचा एकंदर इतर थाटही त्याच मासल्याचा आहे. इची लागवड कोठें झाली ह्मणाल तर, भगवद्गुणानुवादाच्या योगेंकरून आर्द्र झालेलें अंतःकरण हेंच तिचें आळें होय. सत्कर्मपरिपाकामुळें भगवंताच्या ठायीं उत्पन्न झालेलें जें प्रेम तेंच तिचें मूळ-बीज होय. वरील प्रकारच्या अनुपम्य आळ्यामध्यें उगवलेल्या भगवत्प्रेम बीजापासून उत्पन्न झालेला अंकुर तरी तसाच अद्वितीय असला पाहिजे. होय. त्या अंकुरास रत्यंकूर अशी संज्ञा

आहे. अर्थात ज्याप्रमाणें हरियशोगानापासून मन आनंद पावतें त्याचप्रमाणें या रत्यंकुरापासूनही चित्तरंजन होतें. पण या रत्यंकुरासदेखील जीवनाची अपेक्षा आहेच. तें जीवन अंकूर चांगला बळावतोंपर्यंत मिळालें तर बरें; नाहीं तर जागचेजागींच तो करपून जावयाचा. हें जीवन तरी सामान्य नव्हे. संतसज्जनांच्या संगापासून ज्या अनेकविध प्रेमळ हरिकथा श्रवणीं पडतात त्यांपासून निघणारा जो अमृततुल्य मधुर प्रेम रस तोच ह्या भक्तिकल्पलतेस जीवनाप्रमाणें पुष्टिदायक होतो.

**श्रवणादिसमभ्यासनवपल्लवशालिनी ।**
**ध्यानपक्का प्रसूतेऽसौ स्वानन्दफलमञ्जसा ॥ १२ ॥**

या भगवत्प्रेमबीजापासून उत्पन्न होणाऱ्या "भक्तिकल्पलते" चा केवळ अंकुरच जर इतका संतोषदायक आहे तर तिच्या शाखा—फलपुष्पांचा बहार किती अवर्णनीय असेल! भगवद्गुण श्रवण, कीर्तन, स्मरण, पादसेवन, अर्चन, अभिवंदन, दास्य, सख्य, आत्मनिवेदन हे जे नवविध भक्तिमार्ग तेच ह्या आमच्या कल्पलतेचे नवपल्लव होत. ह्यांपैकीं कोणत्याही मार्गाचा अंगिकार केला तरी कैवल्यपदाप्रत खुशाल जाण्यास अडचण पडणार नाहीं. ही कल्पलता एकदां सुप्रसन्न झाली ह्मणजे कोणत्याही वस्तुची तुह्मांस वाण नाहीं. भगवन्निष्टान्तःकरणानें इचें ध्यान करा कीं, ती परिपक्कदशेप्रत पोंचून चित्तास परमानंद देणारें जें आत्मस्वरूपज्ञान तें सहजेंकरून तुह्मांस मोठ्या प्रीतिपूर्वक अर्पण करील. यांत तिळप्रायही संदेह नाहीं. भगवत्प्राप्तीचे कर्ममार्ग, ज्ञानमार्ग, वगैरे इतर

मार्ग आहेत, नाहींत असें नाहीं. पण मूळ ते साध्य करून घेण्यासच शमदमादि साधन क्लेश किती तरी सहन करावे लागतात? अज्ञजनांना ते आहेत आणि नाहीत सारखेच. यासाठी भक्तिमार्ग हाच कैवल्यपदाचा राजमार्ग होय.

रक्षणीयाऽसदालापादसत्संङ्गाच्चसज्जनैः ।
हरेरतिप्रिया भक्तिस्तांविना न स तुष्यति ॥ १३ ॥

साधारण झाडाझुडपांनां ज्याप्रमाणें कीटकांपासून अथवा टोळधाडीपासून धोका असतो त्याप्रमाणें या लतेला एक प्रकारच्या प्राण्यांपासून फार जपावें लागतें. अर्थात पाखंडी लोकांच्या मूर्खभाडित्याची फार काळजी बाळगावी लागते. " कसला ईश्वर आणि कसली माया घेऊन बसला आहांत; हें जगाचें रहाटगाडगें अनादिकालापासून असेंच आपोआप फिरत आहे आणि तें तसेंच फिरत रहाणार हेंहीपण नैसर्गिकच होय. आपणच सर्व करतों आणि करवितों. मध्यें ईश्वराचें आपलें उगाच कांहीं तरी खूळ काढिलें आहे झालें. " असल्या भ्रममूलक दुष्ट प्रलापांपासून कोमल अंत:करणाच्या भक्तजनांनीं अगदी अलग राहिलें पाहिजे. कारण परमेश्वर केवळ निर्मल अशा भक्तिभावाचा भुकेला आहे हें आपणांस मागेंच कळलेलें आहे.

येथपर्यंत परमेश्वरस्तुति आणि ग्रंथस्वरूप-वर्णन झालें. आतां पुढील प्रकरणीं भक्ति कशी साध्य करावी आणि ती साध्य करून घेण्यास अधिकारी कोण याचा विचार करूं.

## प्रकरण तिसरें.

# भक्तिसाधन.

इहादौ विहितं कर्म पुमान्विष्णौ समर्पयेत् ।
ततो ज्ञान विशुद्धात्मा स्निग्धश्चेद्भक्तिमाश्रयेत् ।१४।

भक्तिमार्ग किंवा ज्ञानमार्ग अंगिकारण्यास कर्ममार्ग थोडा तरी आचरावा लागतो. अनेकयोनींतील जन्ममरण-क्लेश भोगून धर्मार्थकाममोक्ष साधनास योग्य असा हा नरदेह आपणांस मिळाला आहे, असें असून याचें सार्थक्य करून न घेणें ह्मणजे आपण होऊनच आपल्या संचिताचा खजिना लुटवून आपले पायात पुन्हा पूर्ववत बिडी अडकवून घेणें होय. तर असें न करिता प्रत्येकानें आपापल्या पूर्वार्जितानें प्राप्त झालेल्या वर्णाश्रमास उचित असें कर्माचरण करून अनन्यभावानें तें ईशचरणीं अर्पण केलें पाहिजे. असें केलें ह्मणजे तें दोषमूलक असलें तरी निर्दोषच होतें, पण तें तदर्पण एकविधपणें मात्र झालें पाहिजे. अशा प्रकारें कर्माचरणाच्या अभ्यासानें जर दैववशात विचारास प्रतिबंधक अशा ज्या विषयवासना यांजवर जय मिळून विशुद्ध झालेल्या अंतःकरणास अति विरक्तता प्राप्त झाली तर—श्रेयस्कर असा जो ज्ञानमार्ग त्याचा अवलंब करावा व शमदमादि जी साधन संपत्ति तिचा यथेच्छ व्यय करून सद्गुरूंनीं सांगितलेल्या मार्गाप्रमाणें "तत्वमसि" अशा महावाक्यांचा विचार करावयास लागावें आणि कर्माचरणाच्या अभ्यासानें ज्यांस विरक्तता प्राप्त न होतां

त्यांची अंतःकरणभूमिका मात्र स्निग्ध ह्मणजे भगवत्प्रेम बीजाची लागवड करण्यास अगदीं तयार अशी होते, त्यांनी परमानंददायक अशा भक्तिमार्गाचा स्वीकार करावा. सर्वभावेंकरून करद्वय जोडून श्रीहरीस प्रार्थावें कीं, "हे परात्परा! आह्मी मूढ जन कसल्या दुस्तर सकटांत सांपडलों आहों. अनंतकाल पर्यंत देखील न अटणाऱ्या अशा ह्या निरवधि संसारसमुद्रामध्यें कामक्रोधादि जलचराच्या मगरमिठींत आह्मीं पूर्णपणं अडकलों असून आतां आमची सुटका होण्याची आशा मुळींच राहिली नाहीं. यांतून सुटण्याची निरर्थक धडपड करण्यास जावें तर तिकडे पुत्रललनादि विषयवासनांचे मोहपाश आं करून-पडलेलेच आहेत! देवा! या कचाट्यातून आमची सुटका कशी होणार! कुटुंबभरणार्थ आह्मास किती तरी दुष्टवृत्तींचें दास व्हावें लागतें आह्मी मोठे, सर्व आह्मांस मान देतात, आह्मी विद्वान, हा आमचा अज्ञानमूलक देहाभिमान, प्रभो! कसारे दूर–होणार! तर बापा! आतां तूंच आमचे रक्षणार्थ धांव घेतली पाहिजेस."

अशाप्रकारें त्यास करुणार्द्र स्वरानें आळविलें ह्मणजे आपोआपच त्याच्या कोमलान्तःकरणास द्रवाचे पाझर फुटतील. सारांश काय तर निष्काम असें कर्माचरण करून ज्याप्रमाणें मनास विरक्तता किंवा स्निग्धता प्राप्त होईल त्याप्रमाणें ज्ञान मार्ग किंवा भक्तिमार्ग स्वीकारावा. याबद्दल महाभारतांतही भगवानांनीं असेंच ह्मटलें आहे.

**योगास्त्रयो मया प्रोक्ता नृणां श्रेयोविधित्सया।**
**ज्ञानं कर्म च भक्तिश्च नोपायोऽन्योऽस्ति कुत्रचित्॥**

आतां हे योगत्रय करण्यास कोण कोणचे लोक अधिकारी आहेत याबद्दल उलगडा पहा:—

**निर्विण्णानां ज्ञानयोगो न्यासिनामिह कर्मसु ।**
**तेष्वनिर्विण्ण चित्तानां कर्मयोगोऽस्तु कामिनाम् ॥**
**यदिच्छया मत्कथादौ जातश्रद्धस्तु यः पुमान् ।**
**न निर्विण्णो नातिसक्तो भक्तियोगोऽस्य सिद्धिदः ॥**

ह्मणजे भक्तियोग जो आहे तो कांहीं असा हलकासलका नाहीं. तो यदृच्छया ह्मणजे परम भाग्योदयेंकरून उपलब्ध होणारा आहे. आतां असा जो भक्तियोग तो साध्यकरून घेण्यास काय काय केलें पाहिजे तें पाहूं.

**सत्संगः क्रियतामादौ भक्तिलाभाय धीमता ॥**
**हरेस्तुष्टिकरा धर्माः श्रोतव्यास्तद्गुणास्तथा ॥ १६ ॥**

मनामध्यें भगवद्भक्तिचा अंकूर उत्पन्न होण्याकरितां प्रथमतः सत्समागम केला पाहिजे. तो प्राप्त होणें कठीण खरें, पण एकदां लाभला ह्मणजे मग काय? साक्षात् कामधेनूचीच कृपा झाली ह्मणावयाची. संतसज्जनांच्या चरणसेवेंकरून त्यांचा अनुग्रह झाला ह्मणजे मग भगवत्पादकमलीं आसक्ति जडण्यास कांहींच अवधी नको. त्यांच्या निकट सान्निध्यानें भगवंतास अत्यंत तोषकारक असा जो भागवतधर्म त्याचा महति कळूं लागते. त्याचें स्वरूप किती उदात्त आहे पहा:—

**सर्वतो मनसोऽसंगमादौ संगं च साधुषु ।**
**दयां मैत्रीं प्रश्रयं च भूतेषु हि यथोचितम् ॥**

शौचं तपस्तितीक्षां च मौनं स्वाध्यायमार्जवम् ।
ब्रह्मचर्यमहिंसां च समत्वं द्वन्द्वसञ्ज्ञयोः ॥
सर्वत्रात्मेश्वरान्वीक्षां कैवल्यमनिकेततां ।
विविक्तं चीरवसनं संतोषं येन केनचित् ॥
श्रद्धां भागवते शास्त्रेऽनिन्दामन्यत्र चापिहि ।
मनोवाक्कायदण्डं च सत्यं शमदमावपि ॥
श्रवणं कीर्तनं ध्यानं हरेरद्भुतकर्मणः ।
जन्मकर्मगुणानां च तदर्थेऽखिलचेष्टितम् ॥
इष्टं दत्तं तपो जप्तं वृत्तं यच्चात्मनः प्रियम् ।
दारान्सुतान्गृहान्प्राणान् यत्परस्मै निवेदयेत् ॥

अहाहा! एकेक तत्व काय पण अप्रतिम आहे! या भागवतधर्माप्रमाणें वागणारा तो पुरुषवर्य श्रेष्ठ होय. याच्या पुढें कोणत्या योगाची आणि धर्माची प्रतिष्ठा चालणार आहे? संतसमागमेच्छा, भूतानुकम्पा, शौच, मौन, आर्जव, ब्रह्मचर्य, अहिंसा, सुखदुःखादि द्वंद्वाविषयीं समभाव, विरक्ततेची आवड, शास्त्रावर पूर्ण श्रद्धा, संतोष, भगवद्गुणश्रवणाची लालसा, अशा या वसुधैवकुटुंबक वृत्तिपेक्षा कठिणतर असा कोणता योग असणार आहे? अशा या भागवत धर्माच्या तत्वश्रवणानें देखील महत्कार्य होतें. संतसज्जनांचे समागमापासून प्राप्त करून घेण्याची दुसरी गोष्ट म्हटली म्हणजे, केवळ भक्तजनांचें कोड पुरविण्यास स्वतः निराकार निरंजन असा असतांही देहधारी होणारा परम कृपाळू भगवान् कृष्ण परमात्मा त्याच्या अनेक अवतारांच्या अद्भुत लीलांचे प्रेमळ आणि रसरंगीन पोवाडे ऐकणें ही होय. तो स्वतः जगदाधार असून गोकुलांतील

निस्सीम भक्ति ठेवणाऱ्या गोपांगना बरोबरही रममाण झाला. यज्ञकर्मांत परम निष्णात आणि दक्ष अशा पुरोहितानी केलेल्या महायज्ञानी देखील जो तोष पावत नाहीं तोच भक्तिभावाचा भुकेला परमात्मा गोपाळबालकांच्या उष्टच्या काल्यानें किती संतुष्ट झाला! अशा एक कां दोन गोष्टी त्याच्या सांगाव्या. आतां ह्या वर निर्दिष्ट केलेल्या साधनानें भक्ति वृद्धिंगत कशी होते तें पहा.

साधवः संगता यत्र वर्णयन्ति हरेर्गुणान् ।
शृण्वन्ति रसिकाः प्रेम्णा भक्तिस्तत्रैव वर्द्धते ।१६।

ज्या ज्या ठिकाणीं भगवत्प्रीय संत मंडळी जमावयाची त्या त्या ठिकाणी गोवर्द्धनोद्धारण, सेतुबंधन, सुग्रीव बिभिषणादिंचें रक्षण या व असल्याच परमानंददायक भगवल्लीलेच्या गोष्टी निघावयाच्याच; व या गोष्टी ऐकून जो आनंद व्हावयाचा तो केवळ पुत्र दूरदेशी असून त्याच्या विद्यासंपादनाविषयी अगर धनप्राप्तिविषयी संतोषकारक बातमी ऐकली ह्मणजे पित्यास जो आनंद व्हावयाचा त्याच्याच बरोबरीचा किंबहुना अधीक असावयाचा. आनंदाची गोष्ट राहो, पण भक्तिचा अंकुर फुटून तो वृद्धिंगत होण्याचीं ठिकाणें तरी हींच.

यत्र भागवती वार्ता तत्र भक्त्यादिकं व्रजेत् ।
कथाशब्दं समाकर्ण्य तत्र सा तरुणायते ॥

असें मुळींच भागवतमाहात्म्यांत वचन आहे. तसेंच भागवतांत सूत ह्मणतात.

निगमकल्पतरोर्गलितं फलं शुकमुखादमृतद्रवसंयुतम् ॥
पिबत भागवतं रसमालयं मुहुरहो रसिका भुवि भावुकाः

ह्मणजे भगवत्कथामृतपान हेंच रसिकांचें जीवन होय. शिवाय भगवत्कथेच्या पावनत्वाविषयीं ह्मणाल तर. तिच्या योगें-करून संसाराविषयी मनांत अप्रीति उत्पन्न होउन चित्तै-काग्रता होत असल्या कारणानें, तिला विद्या, श्रुताध्ययन, जपज्याप्य यांचेपक्षांही अधीक मानिलें आहे.

शुकाचार्यप्रसादेन पीत्वा हरिकथामृतम् ।
निर्जित्य दुर्जयं मृत्यं देवराताऽमरोऽभवत । १७ ।

समुद्रमंथन करून सर्व देवांनी मिळून काढलेल्या अमृता पेक्षांही ज्याचें सामर्थ्य अधीक आहे असें जें हरिकथामृत तें श्रीशुकाचार्यांच्या प्रसादानें प्राप्त करून घेऊन देवरात क्षुधातृषादी शारीरक्लेशांपासून निर्मुक्त होत्साता अमरत्व पावला. परिक्षित राजाची ही गोष्ट तीच. त्यानें या अमृताचा महिमा अनेक परीनें गायिला आहे.

नैषातिदुःसहा क्षुन्मां त्यक्तोदमपिबाधते ।
पिबन्तं त्वन्मुखाम्भोजच्युतं हरिकथामृतं ॥

तर परमानंददायक अशा कैवल्यपदाप्रत पोंहचविणारा असा जो स्त्रीशूद्रादिकानाही प्राप्त होणारा भक्तिमार्ग तो साध्य होण्यास मुख्य साधन ह्मटलें ह्मणजे सत्सग होय. कारण भक्तिकल्पलतेस पूर्ण जोम आणणारें असें जें हरिकथामृत त्याच्या खजिन्याच्या किल्या सर्वस्वीं या साधुसतमंडळीच्याच हातांत असतात. ह्मणून परमभाग्योदयानेंच प्राप्त होणारा जो संतसमागम त्याचा कोणीही अव्हेर करूंनये.

## प्रकरण ४ थें.

# भक्तिमहिमा.

**इत्येकधापि या भक्तिः स्वाश्रितायामृतं ददौ ।**
**नवधावर्धिता सास्मै स्वांविनाकिमहो दिशेत् ।१८।**

या भक्तिचा महिमा खरोखर अगाध आहे. नुसत्या श्रवण भक्तिन्याच योगानें जर मोक्षप्राप्ति होते तर सर्व ह्मणजे नवविध भक्ति सांगितल्या आहेत त्या एकंदर ज्या भक्तश्रेष्ठांनें साध्य करून घेतल्या आहेत त्याला असें कोणतें अनुपम्य फल मिळणार आहे? श्रवण, कीर्तन, स्मरण, भजन, पूजन, अभिवंदन, दास्य, सख्य, आणि आत्मनिवेदन अशा ज्या नवविध भक्ति त्या एकेकीचेंच अवलंबन करून अनुक्रमें परीक्षिति, व्यास, प्रऱ्हाद, लक्ष्मी, पृथु, अक्रूर, हनुमान्, अर्जुन आणि बली असे भक्तशिरोमणि तरून गेले. मग यांपैकी प्रत्येकीचाच हव्यास ज्यानें धरिला आहे त्यास तो जगजेठी कायहो देणार? पण या तादत्म्य झालेल्या भक्तवर्यांना फार इच्छा नसते. त्यांविषयीं भगवान ह्मणतात–

**न पारमेष्ठ्यं न महेंद्रधिष्ण्यं न सार्वभौमं न नरा**
**धिपत्यम् । न योगसिद्धिं न पुनर्भवं वा**
**मय्यर्पितात्मेच्छति मद्विना नान्यत् ॥**

ह्मणजे त्यानां चिरकाल टिकणाऱ्या अशा भगवद्भक्ति-

पुढें महेंद्रस्थान देखील तुच्छ वाटतें. कारण " **लाभो भ-क्तिरुत्तमा** " असें भगवद्वचन आहे.

**हरेः प्रिया उपेक्ष्याश्चाप्रियाश्चेति बुधास्त्रयः ।**
**सुखिनो दुःखिनो भ्रान्तास्तच्छीलं श्रूयतां क्रमात् । १९**

शहाणे ह्मणून मानिलेल्या लोकांत धर्मसंबंधीं बाबतींत तीन भेद करतां येतात. सुखी, दुःखी आणि भ्रान्त. भक्तिमार्गाचा आश्रयकरून निर्गुण अशा परमेश्वराची उपासना जे करतात ते सुखी, जे सर्वनियंता जो जगज्जीवन यास विसरून केवळ अव्यक्त अशा स्वरूपाची उपासना करतात ते हरिचे उपेक्ष्य ह्मणजे दुःखी, आणि सगणोपासक किंवा निर्गुणोपासकही जे नाहींत, केवळ निरर्थक प्रलाप करणारे ते भ्रांत अर्थात् परमेश्वरास अप्रीय होत. हें कशावरून तर पहा.

**ज्ञानिनः सुखभाजस्ते भक्तिनावं समाश्रिताः ।**
**ध्यानाभ्यासेन पक्का ये निस्तरन्ति भवार्णम् ॥ २० ॥**

ज्या ज्ञानी लोकांनीं भगवद्गुणश्रवण कीर्त्तनादि संसारसागरांतून तरून नेणाऱ्या उपायांवर पूर्ण विश्वास ठेऊन भक्तिनौकेचा आश्रय केला आहे तेच खरे सुखी. अध्यात्मिक, आधिभौतिक, दैविक अशीं कितीतरी प्रकारचीं दुःखं मनुष्याला येथें भोगावीं लागतात ! त्या सर्वांतून मुक्त होण्यास भगवद्यशश्रवण हाच एक रामबाण उपाय आहे. त्याच्या साहय्यावांचून अनेक वासनांनीं विक्षिप्त झालेलें असें आपलें अनावर मन आकळितां येणेंच कठीण. भगवद्यशश्रवणाने एकदां तें पूर्ण कबज्यात आलें ह्मणजे मग निर्वेध समाधि लावणें सुलभ जातें, कीं जिच्या साधनमात्रेंकरून ध्याना-

भ्यास पक्व होत्साता संसारार्णवांतून तरून जाण्यास मनुष्यमात्र समर्थ होतात. नावेमध्यें बसलेल्या लोकांना ज्याप्रमाणें अनुकूल अशा वायूच्या कृपेमुळें कांहींएक प्रयत्न करावे लागत नाहींत. त्याचप्रमाणें भक्तिनौकेचा आश्रय करणाऱ्या दैवशाली लोकांना संसारसागरांतून पार पैलथडील जाण्यास ईश्वरानुकूल्यवायूच्या कृपाप्रसादावांचून दुसरें कांहींएक करावें लागत नाहीं.

अव्यक्तासक्तयलाव्वा ये तितीर्षन्ति भवार्णम् ।
भक्तिनावमनादृत्य दुःखभाजो भवंन्ति ते ॥ २१ ॥

परतु संसारचिंतेचें समूल उपशमन करणारी भगवद्गुण श्रवण आणि कीर्तनात्मिक अशी जी भक्तिनौका तिचा अव्हेर करून केवळ अव्यक्त आणि नित्यशुद्ध असें जें ब्रह्मस्वरूप त्याचे ठायीं अत्यासक्ति ठेवणारे जे ज्ञानी लोक ते अखेरीस स्वानंद सुखास आंचवून दुःखार्णवातच गढतात. कारण नित्यशुद्ध अशा त्या ब्रह्मस्वरूपाची खरी ओळख पटणें ह्मणजे कांहीं तोंडची गोष्ट नाहीं. शमदमादि जी साधनसंपत्ति ती साध्य करून घेण्यासच आधीं महा प्रयास पडतात. कामोर्मिवेग सहन करून क्रोध. लोभ, मोह, मत्सरादि नक्रांवर जय मिळविणें फार दुर्घट आहे. हा जय मिळविण्यास ईश्वरानुग्रहाव्यतिरिक्त क्वचितच कोणी समर्थ होतात तो ईश्वरानुग्रह प्राप्त होण्यास ईश्वरोपसना तर अवश्यच आहे. सारांश, संसारसागरातून मुक्त होण्यास भगवद्भक्ति खेरीज सुलभतर असा दुसरा तारणोपाय सांपडणें दुरापास्त होय. आतां केवळ शाब्दिकांविषयीं ह्मणजे जे व्यक्ताव्यक्तोपासनाशून्य त्यांविषयीं पाहूं.

व्यक्ताव्यक्ते ह्यनादृत्य ये शाब्दज्ञानबाहुना ।
तितीर्षन्ति भवाम्भोधिं ते मज्जन्ति निराश्रयाः । २२ ।

व्यक्ताव्यक्त भगवत्स्वरूपाचा अनादर करून शाब्दिकज्ञानरूपी आपल्या बाहुबलानं संसारोदधितील पाणी तोडून जाण्याचा प्रयत्न करणारे ज्ञानीलोक केवळ वृथा टुरटुर करणारेच होत. त्यांचें बाहुबळ क्षीण झाल्याबरोबर ते जागच्याजागींच जलसमाधि घ्यावयाचे. त्याच्या सुकृतदुष्कृतानुरूप त्यानां कोणत्यातरी एकाद्या योनींत जन्म घेणें भाग पडणार. आणि प्राय: ही योनी तरी दुर्योनीच असावयाची. उघडच आहे. केवळ " ब्रह्मोस्मि ब्रह्मोस्मि " या गर्जनेंत ज्यांचें आयुष्य गेलें त्या वृथाभिमानांच्या हातून वर्णाश्रमास उचित असें कर्म थोडेंच झालें असणार आहे, मग त्यानां उत्तमयोनि तरी कशी प्राप्त व्हावी ? त्यांच्या त्या निरर्थक प्रलपांपासून लभ्यांश ह्मणाल तर काडीचाही नाहीं ! " श्रमस्तस्य श्रमफल " झालेले श्रम तेवढे फायद्यांत.

वाशिष्ठांत ह्मटलें आहे—

अन्तस्तिमिरनाशाय शाब्दबोधो निरर्थकः ।
तमो न नश्यते राम कृतया दीपवार्तया ॥

केवळ दीपोच्चारमात्रेंकरून ज्याप्रमाणें घरातील अंधःकार नष्ट होत नाहीं तद्वतच " अहंब्रह्मास्मि " या मंत्राच्या नुसत्या घोषानें अज्ञानांधःकाराचा लोप होणें नाहीं.

तस्मात्पाखण्डिनोऽसंतःशाब्दिका भक्तिदूषकाः ।
वर्जनीयाःप्रयत्नेन हरिभक्तिपरायणैः ॥ २३ ॥

तर मग वर निर्दिष्ट केलेल्या वितंडवादी मंडळीच्या

णाऱ्यास देखील भक्तिमान लोकांनीं उभें राहतां कामा नये. नाहीं तर विनाकारण " ढवळ्याच्या शेजारीं पोवळा " बांधल्या सारिखा प्रकार व्हावयाचा. कारण, हे पाखंडी लोक आपल्या कोरड्या ज्ञानाच्या आढ्यतेंत असल्या कारणानें ते योगत्रयापासूनही भ्रष्ट झालेले असतात. " ब्रह्मैवसत्यं, जगन्मिथ्या, " " कर्तृत्वाचा अगर भोक्तृत्वाचाही अधिकार आपणाकडे नाहीं " वगैरे मोठमोठ्या गोष्टी सांगून ते कर्ममार्ग व भक्तिमार्ग यांची उपेक्षा करितात, आणि ज्ञानाची खरी मखी न कळली असल्या कारणानें ज्ञानमार्गास तर ते मुळापासूनच आंचवलेले असतात. ह्मणून शाहण्या मनुष्यानीं यांचेपासून अगदीं दूर रहावें हें बरें. त्यांचा सहवास वृथा हानीस मात्र कारण व्हावयाचा.

ब्रह्मवैवर्त्तात यशोदेप्रत राधा ह्मणते आहे.

वरं हुतवहज्वालं भक्तो वाञ्छति पञ्जरम् ।
वरं च कण्टके वासं वरं च विषभक्षणम् ॥ १ ॥
हरिभक्तिविहीनानां न संगं नाशकारणम् ।
स्वयं नष्टो बुद्धिहीनो बुद्धिभेदं करोति च ॥ २ ॥
अंकुरो भक्तिवृक्षस्य भक्तसंगेन वर्द्धते ।
परं हरिकथालापपीयूष सेचनेनच ॥ ३ ॥
अभक्तालापदीपाग्निज्वालया कलयापिच ।
अंकुरः शुष्कतां याति पुनः सेकेन वर्द्धते ॥ ४ ॥

ह्मणजे ह्या भक्तिविहीनलोकरूपी कीटकांचा संपर्क भक्तिवृक्षाच्या कोमल अंकुरास फारच अपायकारक होतो.

आतां अशी एक शंका निघण्याचा संभव आहे कीं, " ब्रह्मैवाहं " अशा सदभिमानी, शब्दब्रह्मत परमनिष्णात आणि विद्वान लोकांमध्यें असा एवढा कोणता दोष आहे ? या शंकेचें निरसन श्री शंकराचार्यांनींच केलें आहे.

ये हि वृत्तिं विहायैनां ब्रह्माख्यां पावनीं पराम् ।
ते तु वृथैव जीवन्ति पशुभिश्चसमा नराः ॥ १ ॥
येषां वृत्तिः समावृद्धा परिपक्वा च सा पुनः ।
ते वै सद्ब्रह्मतां प्राप्ता नेतरे शब्द वादिनः ॥ २ ॥

स्वानंदानुभवाशिवाय नुसत्या कोरड्या ज्ञानाचा लेशमात्रही उपयोग नाहीं. नुसतें ब्रह्मज्ञान पुष्कळ समजतें आणि लोकांस सांगतांही येतें, परंतु स्वतःची वृत्ती ब्रह्माकार झाल्या शिवाय सर्व व्यर्थ. आपल्या पुत्रास पितृभक्तिचा महिमा सांगून आपण स्वतः आपल्या पितरांस रोज शिव्यांची लाखोली वाहणारांची ती काय महती ?

---

## प्रकरण पांचवें.

# पाखंडखंडन.

नारब्धा सत्क्रिया येन न वा भक्तिर्हरौ क्वचित् ।
मिथ्यात्वाद्धिहितं त्यक्तं ब्रह्मैवास्मिति बोधतः । २४ ।

मनसोऽगोचरं ब्रह्म मत्वा तत्रैव चिन्तितम् ।
नानुभूतं कचिद्येन स्वात्मसौख्यं समाधिना ॥ २५ ॥
प्रकाश्य विद्वतां लोके विश्वस्तान्मोहयन्खलः ।
सदैवानर्गलो योऽसौ पाखण्डीत्युच्यते बुधैः ॥ २६ ॥

मागील भागीं भक्तीचा महिमा सांगून भक्तिमान् लोकांनीं पाखडी मंडळीपासून अलग राहण्याची खबरदारी घ्यावी ह्मणून सांगितलें. आतां या पाखंडी लोकांची व त्यांच्या विशिष्ठ मतांची जास्त ओळख करून दिली पाहिजे.

आपल्या वर्णाश्रमास उचित अशा यागदानादि सत्क्रिया ज्यांनीं आचरल्या नाहीत, सर्व सुखाचा दाता जो जगदीश्वर त्याची श्रवणकीर्तनादिकेंकरून अनन्यभक्ति ज्यांनीं केली नाहीं. त्याचप्रमाणें ‘ मनास ब्रह्मस्वरूप हें अगोचर आहे, ’ ‘ जग मिथ्या असून कर्तृत्वाचा अगर भोक्तृत्वाचा ही अधिकार आपणांस नाहीं, ’ अशी घमेंड मारून जे ‘ मी ज्ञानी ’ ‘ मी सिद्ध ’ असा सर्वत्र टेंभा मिरवितात, त्यानां पाखंडी असें ह्मणावें. बहुधा असें होतें कीं, ह्या, चित्तशुद्धिकारक कर्ममार्गाचा अव्हेर करणाऱ्या घमंडनंदनांच्या वाग्जालांत पुष्कळ भाविक पण अज्ञानि असे लोक सांपडतात. त्यांच्या लांबलाब ब्रह्मज्ञानाच्या गप्पांत तथ्य किती आहे याचा तिलमात्रही विचार न करतां वरपांगी शद्बालंकारासच भुलून बिचारे “ काय ही विद्वत्ता, केवढा हा आपला भाग्योदय ” असें ह्मणत त्या दांभिकजनांस परमपूज्य मानितात. पण खरें पाहूं जातां हे कर्ममार्गाची उपेक्षा करणारे लोक केवळ ज्ञानयोगाचे प्रावर्णाखालीं आळसटपणांत आणि विषयसुखोपभोगांत आ-

पला सर्व काळ बालविण्यास इच्छितात असेंच ह्मणावें लागतें. त्यानां ह्मणजे खरी मखी टाऊक नसते असें नाहीं, पण मग विषयसुख कसें मिळावें!

सारांश. मुमुक्षुलोकांनीं चित्तशुद्ध्यर्थ प्रथमतः कर्ममार्ग यथाविधि आचरलाच पाहिजे. कारण चित्तशुद्धीवांचून शमदमादिसाधनसंपत्ति प्राप्त होणें नाहीं, आणि शास्त्रज्ञान किंवा ब्रह्मज्ञान जें केवळ ईश्वरानुग्रहान साध्य होणारें आहे तो ईश्वरानुग्रह ज्या भगवद्भक्तिमुळें होतो ती भगवद्भक्ति सर्वस्वीं वर निर्दिष्ट केलेल्या साधनसंपत्तिवर च अवलंबून आहे. पुन्हां ईश्वरानुग्रहानें प्राप्त होणारें जें ब्रह्मज्ञान त्या व्यतिरिक्त चित्तैकाग्रतेची गोडी लागून "मनसोगोचरंब्रह्म" असल्या प्रकारच्या कुतर्कांचे निरसन कसें व्हावें? समाधिसुख मिळून आत्मानुभव कसा व्हावा? आणि सुखदुःख समसमान वाटावयास लागून जीवन्मुक्ति कशी व्हावी! जीवन्मुक्तिखेरीज विषयसुखचिंता पाठ सोडणारी नाहीं. ह्मणजे एका कर्मयोगाचे साह्यावांचून किती तरी गोष्टींस आपण अंतरतों! किती तरी पारमार्थिक हेतूंची परंपरा त्यावर अवलंबून आहे!

आतां वर सांगितलेल्या प्रमाणांनीं ह्मणजे हे पंडित निरुत्तर होणार आहेत असें थोडेंच आहे. ह्या उत्तरांवर त्यांचीं प्रत्युत्तरें हीं येणारच. वर जी एकमेकावर अवलंबून असणारी परंपरा सांगितली तिच्यांतील तत्वांचा परस्परांशीं कार्याकारण संबंध काय आहे असेंच ते मुळीं ह्मणणार! "कर्म, कर्म जें तुह्मीं ह्मणतां तें आह्मीं जन्मांतरींच करून टाकिलें आहे, मग ती चित्तशुद्धि आणि भगवद्भक्ति आह्मांस काय करावयाची आहे?

पाषाणाच्या मूर्तिचें पूजन अर्चन करून रामकृष्णादिकांनीं ज्या लीला केल्याचें पुराणान्तरी वर्णन आहे त्याचें श्रवण कीर्तन करणें हेंच ना त्या तुमच्या भगवद्भक्तिचें स्वरूप! शहाणे तर बुवा असल्या खुळाच्या कधीं नादीं लागावयाचे नाहींत. आणि मुमुक्षु लोकांनां ह्या तुमच्या सगुण भक्तिपासून फायदा तो कोणता? सगुणेश्वराचें स्वरूप तर मायामय आणि दृश्य. 'यद्दृष्टं तन्नष्टम्' हा सिद्धांत जर खरा आहे तर मग तें सगुणेश्वररूपही नाशवतच होय. अशाप्रकारें तुमच्या त्या सर्व कल्पना मूर्खपणाच्याच ठरत नाहींत काय? 'अथातो ब्रह्मजिज्ञासा' या सूत्रावरूनच चित्तशुद्धीनतर लागलींच ब्रह्मविचारणेस आरंभ करावा, भक्तिची गरज नाहीं, असे उघड होत नाहीं काय? ईश्वरानुग्रहावाचून ज्ञान होणें नाहीं असे जे ह्मणतां तें सर्व खोटें. ज्ञानेच्छाही जन्मान्तरीय संस्कारच उत्पन्न करते, आणि या इच्छेनुरूप ज्ञानसंपन्न अशा आचार्याजवळ अध्ययन केलें ह्मणजे झालें. आत्मारामाव्यतिरिक्त सर्व खोटें असें समजून कर्माचा त्याग केला पाहिजे. कर्मत्यागाखरीज मन स्वच्छ होत नाहीं. ज्याचे मन कर्मविक्षिप्त झालें आहे त्याला तत्वज्ञान प्राप्त होणें नाहीं. तत्वज्ञान प्राप्त झालें ह्मणजे मोक्ष तो काय लांब राहिला? तें साध्य होण्यास ध्यान मनन, समाधि वगैरेंची जरूर आहे तर तसेंही नाहीं कारण, ब्रह्म हा मुळीं मनाचा विषयच नाहीं. श्रुतीचेंच वचन आहे कीं, 'अप्राप्य मनसा सह' आणि ध्येय, ध्यात व ध्यान ही त्रिपुटीशून्य जो आत्मा त्याचें ध्यान तें कसें करावयाचें? असें जर उघड आहे तर मग व्यर्थ गोमुखींत हात घालून बसणें ह्मणजे केवळ

अशक्य गोष्टींत कालक्षेप करणेंच नव्हे काय ? द्रवत्व आणि उष्णत्व हे जसे पाण्याचे व अग्नीचे स्वभावसिद्ध धर्म आहेत त्याप्रमाणें चांचल्य हा मनाचा धर्म होय. ज्यांना अंतर्बहिः सर्व ब्रह्ममय आहे हें पूर्ण कळून चुकलें आहे त्यानां चित्तनिरोधाचे प्रयास काय कर्तव्य आहेत ? विकारात्मक जें मन त्यापासून किंवा त्याला होणार सुख थोडेंच खरें व अक्षय असें असणार आहे व आमच्या विषयवासनावर जो आपला एवढा कटाक्ष आहे तोही निरर्थकच होय. " विषयसुख देखील मिथ्या-तें मिळालें काय आणि न मिळाले काय " हें जो सारखेंच लेखीता त्याला त्याचा काय एवढा विधिनिषेध आहे ? स्वप्नापभुक्त नारीला कधीं कोणी प्रायश्चित्त द्यावयास निघाला आहे? नाहीं. कारण तें सर्व मिथ्या या साठीं यथार्थदर्शी-जनांना समाधि नको कांहीं नको. तत्वावबोध हीच त्यांची समाधि. शिवाय वास्तविक पाहतां समाधि ही जागृतादि अवस्थात्रयाप्रमाणेंच एक विशिष्ट मनोऽवस्था आहे. सर्व गुणातीत अशा ज्ञान्याला तिचें कांहीं प्रयोजन नाहीं. नित्य मुक्त असा जो परमात्मा तो मीच असा ज्यास पूर्ण बोध झाला आहे, सुखदुःख आदि करून जीं द्वंद्वें तीं ज्यास समसमान भासतात अशा तत्वज्ञान्यास जर जीवन्मुक्ति नाहीं ह्मणता तर मग ती मिळावयाची तरी कोणाला ? अशा प्रकारच्या विधिनिषेधांतीत विवेक्याला तुह्मी पाखंडी ह्मणतां या तुमच्या मौर्ख्यास काय हो ह्मणावें ? "

हें वरील पाखंडी लोकांचें चऱ्हाट ऐकून शाहण्यांची देखील मति अगदीं कुंठित होणार आहे. पण विचारांतीं

ही ठिसूळ पायावर रचलेली इमारत दिसण्यांत जशी मजबूत दिसत आहे तशी वास्तविक नाहीं हें खालील विस्तारेंकरून केलेल्या विवेचनावरून दिसून येईल.

प्राक् जन्मतिकृतं कर्म नाधुना तदपेक्ष्यते ।
एवं कुतर्कजालं च शाब्दिकनां निरस्यते ॥ २७ ॥

यदि जन्मान्तरे कर्म कृतंचे तर्हि तत्तव ।
अंजरोवोपतिष्ठेत ह्यधुना नान्यथास्ति तत् ॥ २८ ॥

अविरक्तस्य मोक्षेच्छा कथंस्यादिति चेच्छृणु ।
शब्दशक्तिविमोहेन साभवेद् विवेकिनः ॥ २९ ॥

पूर्वजन्मींच आह्मीं कर्माचरण केलें आहे, आणि ह्मणुन आह्मास कर्माची जरूर नाहीं हा शाब्दिकांचा पहिला आक्षेप होय. आतां हा कसोटीस कितपत उतरतो आहे हें पहावयाचें आहे. पूर्वजन्मीं जर कर्माचरण केलेलें असेल तर त्याचा प्रादुर्भाव या जन्मींही झालाच पाहिजे. आणि तो ज्याअर्थीं झाल्याचें दिसत नाहीं त्याअर्थीं पूर्वजन्मीं अगर जन्मजन्मान्तरींही कर्माचरण त्या व्यक्तीचे हातून झालें नसलें पाहिजे. ह्मणून कर्म हें अविनाशी असल्यामुळें तें जरी थोडें बहुत आपले हातून झालें तरी प्रसंगविशेषीं उपयोगी पडतें. आतां कर्माचरणास अजी फाटादेणारे लोकांनादेखील मोक्षेच्छाही असतेच. याचें कारण, काय असावें? तर त्यांना जी मोक्षेच्छा असतें ती ‘ आत्मा अविनाशी, अकर्त्ता, अभोक्ता असा आहे, ’ ‘ जग मिथ्या असून परमपदाप्रत पोहोंचविणारा जो ज्ञानमार्ग हा फार सुलभ “ आहे ” अशाप्रकारची

जीं महावाक्यें नेहमी त्याचे ऐकण्यांत व बोलण्यांत येतात, त्यांवरून होत असावी. अशारीतीनें या ईश्वरविन्मुख लोकानां शास्त्र वगैरे सर्व उलट दिसतें. याला उपाय ह्मटला तर एक भगवद्भक्ति हाच होय. ह्मणून आतां या भगवद्भक्ति संबंधानें काढलेल्या त्याच्या कुतर्कांचें निरसन केलं पाहिचे.

**नन्वर्चायां जडत्वं च मायिकत्वं तथेश्वरे ।**
**विजानद्भिः किमर्थं वै भक्तिः कार्येतिचेत्छृणु ।३०।**
**नेशबुद्धि विनार्चायां पूजनं क्रियते नरैः ।**
**मायिकस्यापि चेशस्य भक्तिर्मुक्तिप्रदा नृणां ।३१।**

"तत्त्वमसि" "ब्रह्मैवाह" वगैरे महावाक्याचें रहस्य ज्यानां पूर्णपणें कळून चुकलें आहे अशा लोकांनीं जड अशा काष्टमय किंवा पाषाणमय प्रतिमेचें पूजन करावें हा केवळ मूर्खपणा आहे, वगैरे प्रकारचे आक्षेप सकृद्दर्शनी खरे भासण्याचा संभव आहे. आणि हे आक्षेप केवळ शास्त्राप्त अगदींच असमत आहेत असेंहा नाहीं. सूत संहितेमध्यें ह्मटलें आहे कीं, हृदयस्थ जनार्दनास सोडून तीर्थें, काष्ट किंवा पाषाण यांचे ठायीं त्यास शोधणें ह्मणजे स्वहस्तांतील पिंड टाकून दुसऱ्याचे हातांतील घांस खाण्यास धांवण्यासारिखेंच आहे. पण वास्तविक सूक्ष्म विचार केला असतां अज्ञजनसमूहाला प्रतिमापूजनच फार श्रेयस्कर आहे असें दिसून येईल प्रतिमापूजन जें आह्मी करितों तें कांहीं खरोखर त्या दारुमय (काष्ट) अगर पाषाणमय मूर्तिचें नसतें. तसें असतें तर मग वाटेल त्या ठिकाणी वाटेल त्या मांडलेल्या मूर्तिचें पूजन, अर्चन

करण्यास आम्हांस काय प्रत्यवाय होता? पण वास्तविक प्रकार तसा नाहीं. प्रतिमेचें जें पूजन करण्यांत येतें तें सर्वस्थ परमेश्वराचे भावनेनेंच करण्यांत येतें. यथाविधि प्रस्थापित केलेल्या मूर्तिचें पूजन ईश्वरबुद्धिनें झालेलें असून पूजनसमयीं ती मूर्ति पाषाणाची आहे की काष्टाची आहे ही कल्पनाही पूजकाचे मनांत नसते. जोंपर्यंत साक्षात्कार झालेला नाहीं तोंपर्यंत अधिकारानरूप प्रतिमा-पूजनच आवश्यक आहे. उठल्या सुटल्याना नुसतां मानसपूजा करतां येईल काय? नाही. श्री भागवतांत भगवानक पिलमुनी ह्मणतात कीं, जों पर्यंत त्हदिस्थ जो परमात्मा त्याची पूर्ण ओळख पटली नाहा तोंपर्यंत प्रतिमापूजनच अत्यावश्यक आहे. वर जें सूतसहितेंतील वाक्य सांगितलें तें केवळ विषयप्रतिपादनार्थच होय. नाहींतर म. "मदर्चां संप्रतिष्टाय मंदिरं कारयेद्दढं" या भगवदुक्तिस हरताळ लावावा लागेल.

हरिभक्तिं विना मायातरणं न भवेन्नृणाम् ।
अतो भक्तिर्विधेयास्य नान्यथाऽनुग्रहो भवेत् ॥३२॥
यावन्नानुग्रहो जातो हरेः प्रणतवत्सलात् ।
न तावत्प्राणिनां शास्त्रं यथार्थमुपातष्ठते ॥ ३३ ॥

एकंदरीत हा मायामोहोदधि तरून जाण्यास एका भक्ति नौकेखेरीज सुलभतर असा दुसरा उपाय आपणा अज्ञ जीवास सांपडणें दुर्घट आहे. प्रत्यक्ष भगवान् ह्मणतातः—

दैवी ह्येषा गुणमयी मम माया दुरत्यया ।
मामेव ये प्रपद्यंते मायामेतां तरंति ते ॥ १ ॥

शमदमादि साधनें करून वेदाभ्यासंग करणें ही, जर पोटीं भक्तिलेश नसेल, तर वृथा प्रयासच होय. आतां शारीरकसूत्रादि वेदांतशास्त्रावरील ग्रंथांतून भक्तिमार्ग हा मोक्षसाधनाचा रस्ता आहे असा कोठें उल्लेख नाहीं, असें ह्मणाल तर हा केवळ भ्रम होय. भक्तीशिवाय ईश्वरास दुसरें अधीक प्रिय कांहीं नाहीं आणि ह्मणूनच सर्व ग्रंथांतून सूज्ञ या भक्तिमार्गास आदेस्थान देतात; कारण ईश्वरानुग्रह प्राप्त करून घेणें असल्यास त्यासारखा सोपा उपाय दुसरा नाही. आणि ईश्वरानुग्रहावर तर सर्व गोष्ठी अवलंबून आहेत. वाटेल त्या शास्त्राचें अध्ययन करा, वाटेल तितकें पाठांतर करा, एका ईश्वरानुग्रहा व्यतिरिक्त सर्व क्षीण होय. योग वाशिष्ठांत ह्मटलें आहे:—

यावन्नानुग्रहः साक्षाज्जायते परमेश्वरात् ।
तावन्नसद्गुरुः कश्चित्सच्छास्त्रमपि नो लभेत ॥ १ ॥

मिळून ईश्वरानुग्रह ह्मणजे ईश्वरोपासना ही अत्यावश्यक आहे.

न कर्मणेति वाक्येन यस्त्यागोभिमतस्तव ।
स किं चित्तनिरोधार्थमुताहो क्लेशमुक्तये ॥ ३४ ॥
मिथ्यात्वा त्कर्म चेत्त्याज्यं कर्ता करस्तस्य तं वद ।
उभयोर्यदि मिथ्यात्वमाग्रहस्तेह्यनर्थकः ॥ ३५ ॥

कर्माचरणापासून जर मोक्ष मिळेलच असें नाहीं तर मग कर्माचरण कर, कर्माचरण करा असा जो आमचे भोंवतीं अट्टहास चालू आहे याचा अर्थ काय? खरें आहे. पण कर्मत्याग तुह्मी जो करणार तो काय हेतूनें. शमदमादि साधनें करून चित्तनिरोधार्थ जर तो असेल तर

मग हरकत नाहीं. नपेक्षां केवळ त्यापासून शरीरास होणारा त्रास चुकावा हाच जर त्या त्यागाचा हेतु असेल तर मग त्यांत कांही हशील नाही असल्या त्यागास राजस त्याग अशी संज्ञा आहे. त्यापासून कोणताही फलप्राप्ति होणें तर दूरच आहे, किंबहुना असल्या प्रकारचा त्याग होणेंच अशक्य आहे.

"नहि कश्चित् क्षणमपि जातु तिष्ठत्यकर्मकृत" श्री भ.

मायेचा जावत्कालपर्यंत आश्रय आहे तावत्कालपर्यंत मी कर्म सोडीन किंवा करीन असें ह्मणणें हा अज्ञानपणा आहे. भगवद्गीतेंत ह्मटलें आहे कीं, जो कर्मापासून उत्पन्न होणाऱ्या फलाची आकांक्षा रहित होत्साता कर्माचरण करतो तोच खरा त्यागी. उचित कर्माचा त्याग करून सिद्धासारखें कर्महीन निश्चयानें होतां येत नाही. आतां सर्वत्र मायेचाच पसारा आहे ह्मणून येथील कर्माचरणही मिथ्याच असें ह्मणाल तर कर्माचरण करणारी माया तरी सत्य आहे कीं नाहीं याचा विचार करावयास पाहिजे. कर्म आत्म्याचे हातून होतें असें ह्मणावें तर तो निर्विकार निर्विकल्प असा आहे. देहेंद्रियाकडून झालें असें ह्मणावें तर तीही जड आणि अकर्तृत्वान् आहेत. सारांश कर्मत्याग करणें—ह्मणजे केवळ वेडेपणाचा आग्रह धरणें आहे.

**महा वाक्य विचारेण ज्ञातं ब्रह्म कथं त्वया ।**
**शब्दतो मनसा वा तद्यथा ज्ञातं तथा वद ॥ ३६ ॥**
**शब्दतश्चेन्न तद्ज्ञानं मनसाचेन्न ते मतं ।**
**ज्ञानाऽभावेऽप्यहो ध्यानं मननं चापि निंदितम् ॥ ३७ ॥**

**निदिध्यासं विना न स्यात् स्मरणं ह्यात्मनः क्वचित् ।**
**तद् भावे मनोनाशो नच स्याद्वासना क्षयः ॥ ३८॥**

त्याचप्रमाणें " तत्वमसि " " ब्रह्मै वाहं " वगैरे नुस्त्या वाक्यांवर तुटपुंजा विचार करून आह्मांस आत्मानात्म विचार झाला असें जर कोणी ह्मणेल तर ती निव्वळ वाचाळता आहे. स्वरूप साक्षात्कार नाहीं आणि उगाच "ब्रह्म ह्मणजे मीच" असें ह्मणूं लागल्यास कोण ऐकणार आहे? मनन करतां करतां हें ज्ञान झालें असें ह्मणाल तर " मनसा गोचरं ब्रह्म " हा तर आपला दृढ सिद्धांत. स्वरूप साक्षात्काराशिवाय सर्वच ब्रह्ममय आहे किंवा देहाचे ठायींच आत्मा आहे असा नुस्ता कोरडा निश्चय कांहीं कामाचा नाहीं, समजा कीं एका आर्त दरिद्री मनुष्यास भिक्षा मागतांना पाहून एका दयाळु मनुष्यानें सांगितलें कीं, बाबा, तूं विनाकारण भिक्षा कां मागतोस? तुझ्या घरांत तर अपार भूमिगत संपत्ति आहे. खरें आहे. त्या दयाळू मनुष्याचे ह्मणण्या प्रमाणें त्याच्या घरांत पुष्कळ धन असेल, पण तें प्राप्त करून घेऊन स्वतःस दारिद्र्यमुक्त करून घेण्यास ती विशिष्ट जागा शोधून काढून त्या ठिकाणीं खणलें पाहिजे. केवळ अमुक ठिकाणीं तें धन आहे अशी समजूत होऊन कोणताही फायदा नाहीं.

सदर्हु प्रमाणेंच "सर्व ब्रह्ममय आहे" किंवा "हृदस्त परमात्मा आहे" अशी नुसती समजूत उपयोगाची नहीं. त्यास कांहीं तरी साक्षात्कार हा पाहिजेच! आत्मगीतेंत ह्मटलें आहेः-

यथागाधनिधेर्लब्धौ नोपायः खननं विना ।
मल्लाभेऽपि तथा स्वात्मचिंतां मुक्त्वा नचापरः । १ ।
देहोपलमपाकृत्य बुद्धिकुद्दालकात्पुनः ।
खात्वा मनोभुवं भूयो गृण्हीयान्मां निधिं पुमान् ॥

ह्मणजे मुख्य गोष्ट ही कीं, संपत्तिविषयक दृष्टांतामध्यें जसें धनप्राप्तिस खनन हेंच खरें साधन आहे त्याप्रमाणेंच स्वरूप साक्षात्कार होण्यास स्वात्म चिंतनाशिवाय दुसरा उपाय नाहीं. बुद्धिरूप कुदळीनें मनोभूमि उकरली पाहिजे. तेव्हांच तो इच्छित निधि सांपडणारा आहे. श्रवण केलेल्या गोष्टींचें सूक्ष्म दृष्टीनें चिंतन झालें पाहिजे. स्वस्वरूपाचा पूर्ण ध्यास लागल्या व्यतिरिक्त त्या निर्विकार, आनंदैकस्वरूप चैतन्याची ओळख कशी पटावी? ज्या गोष्टीचा निदिध्यास नाहीं त्या गोष्टींचें स्वरूपज्ञान कसें होणार? आणि खरें पाहतां स्वस्वरूपानुभवावर तर सर्व कांहीं अवलंबून आहे. संकल्प विकल्पात्मक असें जें मन तें अनेकविधवासनांपासून मुक्त होण्यास त्यास स्वरूप स्मरणाची फार आवश्यकता आहे; आणि वासनाक्षय विषयचिंतापरित्यागा वाचून होणें नाहीं.

मनसा स्मरणं मास्तु स्मृतिर्मेस्ति स्वरूपतः ।
इतिचेत्तत्रसानास्ति द्वैताभावे कुतः स्मृतिः ॥ ३९ ॥
स्वरूपेणस्मृतिर्मास्तु सा भवेत् जीव रूपतः ।
इतिचेत्तर्हि जीवेऽपिस्मृतिश्चित्तेन जायते ॥ ४० ॥
येनैकाग्रधियापुंसा समाधावनु भूयते ।
स्वसौख्यं स्मर्यते तेन नान्यथा तत्तथासति ॥ ४१ ॥

यावर देखील जर कोणी असें ह्मणण्यास तयार होईल की, 'मनानें स्वरूप-स्मरण न होऊं द्या. मृत्पिंडतुल्य मनानें तें स्वरूप स्मरण काय होणार आहे ?'

**"यत्र ज्ञानं तत्रैव स्वपराव बोधरूपास्मृतीस्तिष्ठति।"**

"जेथें ज्ञानाचा आश्रय आहे तेथेंच खरें स्वरूप ज्ञान." परंतु हा ही केवळ भ्रमच होय." खरें पाहूं जातां स्मरण आणि स्मर्तव्य असा द्वैत भाव मानणेंच चूक आहे, आणि जेथें द्वैताचा विचार आला तेथें आत्मदर्शन कोठचें ? त्याचप्रमाणें बुद्धिच्या सहायानें जीवात्म्यास स्मृति होण्यास कठीण नाहीं असें जरी मानलें तरी तेंही बरोबर होत नाहींच; कारण मनाच्या उपाधीशिवाय जीवात्म्यास ही स्मृति नसते हें निद्रावस्थेवरून उघड होतेंच. जागृतावस्थेंत जेव्हां मनाचे व्यापार सुरळीत असतात तेव्हाच काय ती त्यास स्मृति; आणि ही देखील दोन प्रकारची असते. अज्ञ लोकांची स्मृति अनात्म विषया ह्मणजे स्त्री, अन्नपानादि भोगासंबंधीची आणि सूज्ञांची ह्मटली ह्मणजे ती चिदानंदैकरूपा अशी असते. ज्या विचारवंत लोकांनी एकाग्र व निश्चल मनानें समाधी लावून स्वात्मसौख्याचा अनुभव घेतला आहे त्यानाच काय ती या सौख्याची स्मृति जागृतावस्थेंत असणार, आणि त्यांनाच ब्रह्म सत्य असून जग हें मिथ्या आहे अशी साक्ष पटणार. एवंच-स्वात्मानुभवाशिवाय सर्व मिथ्या आहे.

**ब्रह्म सत्यं जगान्मिथ्यत्यनुभूत कदा त्वया ।**
**नानुभूतं तथाप्यस्ति निश्चयो गुरुवाक्यतः ॥ ४२ ॥**

**इतिचेदनुमानं तत्स्वर्गस्येव न दर्शनम् ।**
**समाधि मंतरा कृत्स्नं स्वात्मानं द्रष्टुमर्हति ॥ ४२ ॥**

ह्मणून पुन्हां शाब्दिक अशा पाखंडी लोकांना जर प्रश्न केला कीं, "ब्रह्म सत्य असून जग देखील रज्जुभुजंग न्यायवत् मिथ्याच आहे" असें जें आपण मोठ्या शहाणपणाचा आव आणून सर्वत्र भटकत सुटतां त्या तह्मी स्वतः याचा अनुभव कधीं घेतला आहे काय? तर ते काय उत्तर देणार! "छेः बुवा, स्वतःला अनुभव तर नाहीं पण आमच्या गुरुमहाराजांनीं हें आह्मांस सांगून ठेविलें आहे व त्यावर आमचा पूर्ण विश्वास आहे" हेंच कीं नाही! यांतच लोकांची मोठी चूक होत आहे. त्यांना एवढें कळत नाहीं कीं, निश्चल निर्विकल्प अशा समाधीनें प्राप्त होणारें जें आत्मस्वरूपदर्शन त्याची थोरवी केवळ अनुमानानें कशी कळेल? शास्त्रांमधून वगैरे आपण एकतों कीं, स्वर्गलोक फार रमणीय आहे अन् असा आहे अन् तसा आहे. व या वर्णनावर आपला विश्वास नसतो असें नाहीं. पण या आपल्या नुसत्या कोरड्या विश्वासानें आपणांस स्वर्ग खरा कसा आहे हें थोडेंच दिसणार आहे? वर्णनें ऐकून नुसती कल्पना बांधतां येईल पण त्यांत खरा अनुभव असणार आहे काय? आतां गुरुवचनें किंवा शास्त्र-वचनें खोटीं आहेत असें ह्मणण्याचा आमचा हेतु नाही. तीं सर्व खरीं आहेत पण त्यांच्या खरेपणा विषयींचा अनुभव ज्याचा त्यासच पाहिजे. योगवासिष्ठात ह्मटलें आहे:—

**यदा देहं पृथक्कृत्वा चिति विश्रम्य तिष्ठसि ।**

**तदा तृणी कृताशेषः स्वयमेको भविष्यसि ॥ १ ॥**
**येनेदंवेत्सि तज्ज्ञात्वा कुरु प्रत्यङ्मुख मनः ।**
**ततः प्रकाशरूपत्वं द्रक्षसि स्फुटमात्मनः ॥ २ ॥**

जेव्हां देहरूपी आवरण दूर करून चैतन्याचे ठायीं पूर्णपणें तुह्मी रममाण व्हाल तेव्हांच आसमंतभागांतील सर्व पसारा तृणसमान आहे अशी खात्री पटून अद्वितीय अशा आत्मस्वरूपाचा अनुभव तुह्मांला येईल. मनोवासनांची दूरवर पसरलेलीं जाळीं तोडून त्याचा सर्व कल फिरविला ह्मणजे स्वतःचें प्रकाशरूपत्व स्पष्टपणें दृष्टोत्पत्तीस येऊन जगाच्या मिथ्यत्वाचा साक्ष पटेल. ज्याप्रमाणें डोळे असूनही अंधःकारात दोरीवर पाय पडला असतानां ती खरीच दोरी आहे की सर्प आहे याचा निर्णय करण्यास प्रकाशाची अवश्यकता असते तद्वतच " तत्वमसि " या महावाक्याचा खरा साक्षात्कार होण्यास समाधिरूप ज्ञानदीपाचीच जरूर आहे.

**समाधिश्चेन्मनोवस्था मुक्तेः किं कारणं वद ।**
**ज्ञानंचेत्तदधिष्ठानं देहो वात्मा नचो भयम् ॥ ४४ ॥**
**प्रकाशस्याश्रयो यद्वद्वर्ति स्तैलाग्नि संयुता ।**
**ज्ञानस्याप्याश्रयस्तद्वन्मनो देहात्म संयुतम् ॥ ४५ ॥**

" पण ही जी समाधि ह्मणून तुह्मीं ह्मणतां ती तर मुळीं एक मनोवस्था आहे असें आह्मीं ह्मणता. " ठीक आहे. परंतु मग मोक्षास समाधिवांचून दुसरा मार्ग तो कोणता ? " ज्ञान " कबूल आहे. आतां एकदां या ज्ञानाचें अधिष्ठान ठरविलें ह्मणजे सर्व कांहीं ठीक झालें

णार आहे. ज्ञानाचें अधिष्ठान देह आहे ह्मणावा तर तो जड आणि स्थूल असा आहे. बरें आत्मा ह्मणावा तर तो अद्वितीय व चिदेकरूप असल्या कारणानें दुसऱ्यास आधारभूत होईल हें कसें संभवतें? ह्मणून ज्ञानाचें अधिष्ठान केवळ देहही नाहीं आणि केवळ आत्मा ही नाहीं. रात्रीं प्रकाशास आधार काय? तर तैलाग्नियुक्त अशी वात. तद्वतच ज्ञानाचा आश्रय ह्मटला ह्मणजे देह आणि आत्मा यांनी संयुक्त असें मनच होय. मन हें संकल्प विकल्पात्मक असें असूनही त्यावर ज्ञानाचा प्रादुर्भाव कसा होतो ह्मणाल तर मृत्तिकाविशिष्ट असा जो आरसा त्यावरही सूर्यबिंब पडतें. मग पंचमहाभूतांपासून उत्तीर्ण झालेलें जें मन त्यावर चित्प्रतिबिंब पडतें असें ह्मणणें सयुक्तीक होणार नाहीं काय? यावरून ज्ञानाचें अधिष्ठान मन आहे हें सिद्ध झालें.

तस्मान्मनो भवेत्पुंसाः कारणं बंध मोक्षयोः
तदस्यशुद्धशुद्धिभ्यां बंधमोक्ष विधायकम् । ४६ ।
निवर्तन्ते यतो वाचोह्यप्राप्यमनसासह ॥
इतिचेत्तदशुद्धेन हृदाशुद्धेनवाप्यते ॥ ४७ ॥

पण उलटपक्षीं हेंच प्रतिबिंब ग्रहण करण्याची शक्ती अंगीं असल्याकारणानें ज्ञानाचें अधिष्ठान झालेलें मन जीवांच्या बंधनास कारण होतें याचें कारण काय? अखिल जीव मायाजालांत गुरफटून गेले असल्या कारणानें त्यांच्या हातून विहीतकर्मे होत नाहींत; त्यामुळें असें होतें कीं मनावर दुर्वासनांचा पगडा बसून तें अशुद्ध होतें, मग अर्थातच मोक्ष साधनास योग्य असें रहात नाहीं. योग-

वासिष्ठ व स्मृति यांचाही असाच अभिप्राय आहे. पण श्रुति "नेति नेति" ह्मणून कानावर हात ठेविते. परंतु खरें पाहतां हा श्रुतिचा अभिप्रायच बहुतेकांना कळत नाहीं. मनास ब्रह्म अगम्य आहे असा त्याचा खरा अर्थ नसून संकल्परहित अशा मनानें विचारणा केली असतां तें त्यास प्राप्त होणारें आहे. उपनयनविधि झाल्याबरोबर तो अष्ट वर्षांचा कुमार ह्मणजे ब्राह्मण बनतो असें नाहीं. त्यानें वेदाभ्यास झाल्यावर शुद्ध मनानें ब्रह्माचा शोध सूक्ष्मपणें केला तरच त्यास ब्राह्मण ह्मणतां येईल.

**दृश्यते त्वग्र्यया बुद्ध्या सूक्ष्मया सूक्ष्मदर्शिभिः ।**
**मनसै वेदमाप्तव्यमित्युक्तं श्रुति भिः स्फुटम् ॥ ४८ ॥**

शुद्ध आणि अशुद्ध हे जे मनाचे दोन प्रकार वर्णिले ते कांहीं मनःकल्पित नाहींत. त्यासंबधीं बिंदूपनिषदांतच आधार आहे:-

**मनोहि द्विविधं प्रोक्तं शुद्धंचाऽशुद्धमेव च ।**
**अशुद्धं काम संकल्प्य शुद्धं काम विवर्जितम् ॥ १ ॥**

अशुद्ध ह्मणजे विषयवासनांनीं दूषित झालेलें व शुद्ध ह्मणजे काम विवर्जित. ह्मणून वेदांतविचारसंपन्न अशा सूक्ष्मदर्शी लोकांनीं शमदमादि साधनेंकरून निर्विकल्प अशा ब्रह्माविषयीं विचार करावा. जड अशा मनास ज्या अर्थी आत्मा दृश्यमान होतो त्याअर्थी तो घटवत् अनित्य ह्मणजे नाशवंत असावा, व यावरून शास्त्रांत जें आत्मा स्वसंवेद्य आहे ह्मणून ह्मटलें आहे तें खोटें ठरतें. पण खरा प्रकार तसा नाहीं. आतां आत्म्यास स्वतंत्रपणें जरी

स्वरूपदर्शन करतां येत नाहीं तरी आरशांतील प्रतिबिंबाप्रमाणें त्यास स्वस्वरूपप्राप्ति होते. एकादा डोळस मनुष्य ज्याप्रमाणें आपलें रूप दर्पणामध्यें पाहतो. त्याचप्रमाणें आत्मा बुद्धिद्वारा आपलेच ठायीं आपलें स्वरूप पाहूं शकतो. ह्मणून आत्मसुख बुद्धिग्राह्य आहे.

आत्मसौख्यं मनोग्राह्यं यदिस्यान्नश्वरंहि तत् ।
नैवं द्वैत निरासेन नित्यं बुद्धौ प्रकाशते ॥ ४९ ॥
सम्यग्वीक्षताश्चित्तं ज्ञानिना नश्यतिक्षणात् ।
ततो गच्छति तद्यथा सम धिस्तस्तत्रहि ॥ ५० ॥

पण पुन्हां आत्मसौख्य बुद्धिग्राह्य आहे असें ह्मणाल तर मग तें नश्वर ह्मणजे क्षणिक कसें ठरतें? पण खरें तसें नाहीं. ज्याप्रमाणें नभोमंडळाचे ठिकाणी अभ्रांचें काळेंकुट्ट आवरण उध्वस्त झालें ह्मणजे सदैव तळपत असलेलें सूर्यबिंब आपल्या अतुल प्रकाशानें आविर्भूत होतें तद्वतच ज्या बुद्धिचे ठायीं शुद्ध आणि सत्व असेच गुण अवशिष्ट राहिले आहेत तेथें द्वैत निरासाच्या योगेंकरून अनादिसिद्ध असें आत्मसौख्य नित्य प्रकाशमान होत असतें.

" दर्पणे बिम्बकोऽह्यर्कः प्रकाशं कुरुते यथा ।
तथा प्रकाशयत्यात्मा स्वच्छधीष्वपु बिम्बत " ॥

हा योगवासिष्ठांतील पुरावा यास बस आहे. ब्रह्म अमूक किंवा अमूक प्रकारचें आहे अशी व्याख्या करतां येत नसल्यामुळें अज्ञानावरण दूर करण्याकरितां वृत्तिव्याप्ति फार अवश्यक आहे. पंचदशीमध्यें सांगितलें आहे:

ब्रह्मण्य ज्ञान नाशाय वृत्तिव्याप्ति रपेक्षिता ।

**स्वतः स्फुरणरूपत्वान्नाभास उपयुज्यते " ॥ १ ॥**

एकादे ठिकाणीं असलेला घट अवलोकन करण्याकरितां ज्याप्रमाणें दीप आणि चक्षु या दोहोंचीही गरज लागते पण सूर्यबिंब पहाण्यास फक्त चक्षु असले म्हणजे झालें त्याचप्रमाणें ब्रह्मदर्शनार्थ केवळ वृत्तिचीच अपेक्षा आहे; चिदाभासाची गरज नाहीं. ह्मणून स्वाज्ञानावरण काढून टाकण्यास शुद्ध मनच पाहिजे.

**" चित्तमेव हि संसारस्तत्प्रयत्नेन शोधयेत् "**

असा अभिप्राय **पंचदशी** वगैरेंमधून सर्वत्र आहे. आतां हा जो विचार झाला तो यथार्थ विचार ज्यांना नाहीं त्या योगी लोकांविषयींचा झाला. देहेंद्रिय प्राणादिक सर्वच आत्मामय आहेत, आत्म्यावांचून भिन्न असें कांहींच नाहीं असा ज्या ज्ञानी लोकांचा ठाम विचार झाला आहे त्यांचा चित्तशुद्धि होण्यास मुळींच वेळ नाहीं. जागृतावस्थेंत स्वप्नाची ती किंमत काय ? योगाभ्यासाप्रमाणें चिरकाल मनोनिग्रहाची त्यास अपेक्षा नाहीं. सर्व ब्रह्ममय आहे अशी अन्वयसमाधि ज्या ज्ञान्यास प्राप्त झाली आहे, त्याचें मन ज्या ज्या आकारविशिष्ट पदार्थाकडे जातें तेथेंच त्याची अनायासें समाधि लागून वृत्ति तदाकार होते. अशा प्रकारें चित्तनिरोध व सम्यग्दर्शन असे अनुक्रमें अज्ञानी व ज्ञानी यांचे निरनिराळे मार्ग झाले.

**कथं पश्यसि सम्यक्त्वं मनसा चक्षुषाऽथवा ।**
**मनसोऽविषयं तेऽस्ति ब्रह्माक्ष्णोर्नहि गोचरम् ।८१।**

आतां शब्दशास्त्रांत परम निष्णात जे पाखंडवादी

यांचा विचार उरला. मनाच्या साधनानें आत्मसुख प्राप्त होतें असें जर ते ह्मणतील तर " मनोमिथ्या " हा त्यांचाच सिद्धांत. नेत्रांच्या योगेंकरून आत्मस्वरूप पाहूं ह्मणतील तर तेथंही त्यांची बाजू लंगडी पडते. कारण " यद्दृष्टं तन्नष्टम् " ह्मणजे दृश्यमान् ह्मणून जेवढें आहे तेवढेंही नश्वर होय. मग ह्या आपल्या चर्मचक्षूंना अव्यक्त निर्विकार असें ब्रम्ह कसें दिसणार ? परंतु शमदमादि साधनसंपत्तिच्या योगेंकरून संकल्पविकल्पात्मक जें मन त्याचा ज्यानीं नाश करून टाकिला आहे अशा अधिकारी पुरुषाचेंच मन आत्मनिष्ट होऊं शकतें. म्हणून मनोनिरोधावांचून शुद्ध व कूटस्थ अशा ब्रम्हाचा साक्षात्कार होणें नाहीं; आणि या साक्षात्कारा व्यतिरिक्त सर्वत्र ब्रम्ह आहे अशी समजूत पटून जीवन्मुक्तिही मिळणार नाहीं. कारण

मनोजयं विनातेऽस्ति जीवन्मुक्तिः कथं वद ।
आत्माऽभेदाव बोधेन जीवन्मुक्तिर्मतास्ति वै ॥ ५२ ॥
साधनेश्चशमोपेतै नं मनो निश्चलंभवेत्
यतःस्वभाव विक्षिप्तं प्रारब्धाधीनमेवतत् ॥ ५३ ॥
जले द्रवोऽजले दाहो यथास्वाभाविकस्तथा ।
धर्मोःकामादयःसन्ति चित्ते स्वाभाविकाः किल ।५४।

आतां यावर त्यांचें नेहमींचें उत्तर येणारच कीं, 'तत्वमसि' या महावाक्याच्या नित्यविचारेंकरून जीव व आत्मा हे एकमेकांपासून भिन्न आहेत हा जो बोध झाला हीच जीवन्मुक्ति त्या ज्ञानाचे पाठोपाठ ती प्राप्त व्हावयाचीच. अशा सुलभ रीतीनें केवळ विचारमात्रेंकरून इष्ट हेतु

साध्य होतअसतांना दुर्घट उपायांचें अवलंबन करणें मूर्खपणा आहे. ज्याप्रमाणें द्रव व दाह हे अनुक्रमें जल व अग्नि यांचे स्वभावसिद्ध गुण आहेत त्याचप्रमाणें चंचलता हा ही मनाचा धर्म आहे. पाण्याचें द्रवत्व व अग्नीचें दाहकत्व कोणी दूर करूं शकला आहे काय? तद्वतच नित्याभ्यास अगर एकांतनिवास यांहीकरून मन स्थिर होऊं शकणार नाहीं. मन त्रिगुणात्मक असून रजोगुणानें केलेला विक्षेप हा त्याचा स्वभावसिद्ध धर्म आहे. पूर्वजन्मीं जसजसें आचरण हातून घडलें असेल तसतशीं कर्में या जन्मीं जीवांकडून होणारच; यांत तिलप्राय ही संदेह नाहीं.

इतिचेतकामनिर्मुक्तिःश्रुत्युक्ता निष्फलाभवेत ।
तस्मादागन्तुकास्तेस्युरविधा कर्म संभवाः ॥ २८ ॥

असें जर आहे तर मग श्रुतिमधून वर्णिलेली कामनिर्मुक्ति खोटी ठरते. मनाचेठायीं वास करणारे सर्व हेतु जेव्हां नाहींसे होतात तेव्हां ते मर्त्यप्राणी सायुज्यतेप्रत पावून ब्रह्मीं लीन होतात. नानाप्रकारचे तरंग व बुडबुडे यांचें आश्रयस्थान ज्याप्रमाणें पाणी त्याचप्रमाणें अनेक विचारतरंगांचें उत्पत्ति व लयस्थान ह्मटलें ह्मणजे मन हें होय. पृष्टभागावर तरंग व बुडबुडे येणें हा कांहीं पाण्याचा प्रकृति धर्म नाहीं. ते केवळ वाय्वादिजन्यच होत. तद्वतच मनामध्यें उत्पन्न होणारे सर्व विकार आगतुकच ह्मटले पाहिजेत. हे आगंतुक विकार उत्पन्न होण्याचें कारण, खरें स्वरूपज्ञान नसल्यामुळें अज्ञानेंकरून जीं शुभाशुभ कर्में आपले हातून होतात त्या त्या कर्मानु-

रूप होणाऱ्या वासनाजळाचेठायीं द्रवत्व असणें किंवा अग्नीचेठायीं दाहकत्व असणें हे जसे त्यांचे स्वभावसिद्ध गुण आहेत तसें मनाचे ठायीं विकल्प उद्भवणें हा कांहीं त्याचा प्रकृतिधर्म नाहीं. "काम एष क्रोध एष रजोगुण समुद्भवः" असें मळीं श्री भगवानांनीच ह्मटलें आहे. आणि हा रजोगुण मनाचे ठायीं स्वाभाविकपणें असलाच पाहिजे असें नाहीं. कारण अंतःकरण जरी त्रिगुणात्मक आहे तरी तेथें वस्ती सत्वगुणाचीच. वरपांगीं असणाऱ्या व केव्हां केव्हां आपलें पूर्ण वर्चस्व स्थापू पाहणाऱ्या ह्या रजःस्तम गुणांस योगी लोक आपले अंतःकरणांत मुळींच जागा देत नाहींत. सारांश मन हें स्वभावचंचल नाहीं. ह्मणून मनोनिग्रहावांचून मोक्षार्थ प्रयत्न करणें निरर्थक होणार आहे. तें असो. कामनिर्मुक्ति प्राप्त करून घ्यावी ह्मणून मागें सांगितलें खरें; पण मग "काममय एवायं पुरुषः" म्हणजे पुरुष हा कामक्रोधादिकांचा गड्डा आहे या आबाधित चाललेल्या सिद्धांतास बाध येत नाहीं काय? खरें आहे.

**स्वाभाविकोस्ति कामश्चेत्तर्हितं कुरु मासति ।**
**नास्त्यनात्मसमं दुःखं न सुखंस्वात्मनासमम् ।५६**
**सुखार्णवन्मनोमीन ईषमायोर्मि वेगतः ।**
**देहादि कर्दमेऽभ्येत्य जीवत्यल्प सुखे भ्रमन् ।५७।**

कामक्रोधादि विषय पुरुषांचे मागें स्वभावसिद्धपणें लागले आहेत हें जरी एकपक्षीं खरें मानिलें तरी त्यांचा उपयोग असत् ठिकाणीं म्हणजे देहेंद्रिय, दारापुत्रादिकांचे ठायीं करावा हें कोणी सांगितलें आहे? अंतःकरणाचे

ठायीं सुखाभिलाष उत्पन्न होणें हें साहजीक असेल, तरी इंद्रियसुखोपभोग घेणें रास्त होणार नाहीं कारण तें खरें सुख नसून केवळ क्षणमात्र भासणारें असें आहे. केवळ अज्ञानामुळें आपण त्याची अपेक्षा करीत असतों. तेंच सत्कर्मपरिपाकानें ज्यांची बुद्धि शुद्ध झाली असेल ते सूज्ञ लोक लक्षात न आणतां अनात्मचिंता सोडून स्वात्मसुखाचे पाठीमागें लागतात. त्यांच्या इतर सर्व वासनांचा क्षय झालेला असतो; आणि हा वासनाक्षय ह्मणजेच मोक्ष.

“ न मोक्षो नभसः पृष्ठे पाताळे नच भूतळे ।
सर्वाशा संक्षयेचेतः क्षयो मोक्ष इतीष्यते ॥ १ ॥”

या योगवाशिष्ठांतील उताऱ्याचा अर्थ-“ मोक्ष ही कांहीं आकाशांत, पाताळांत किंवा भूतलावर सांपडणारी एखादी वस्तु नाहीं, अंतःकरणात उद्भवणाऱ्या अनेक वासनांचें निर्मूलन होणें ह्मणजे मोक्ष मिळाल्या सारखेंच आहे. या मोक्षसुखाची गोडी भुवनत्रयावर ही कशांतच सांपडणार नाहीं. असें असतांही हें आत्यंतिक व नित्यमेव टिकणारें आत्मसुख असाध्यसें वाटून मनास अत्यल्प अशा विषयसुखांतच मजा वाटते. ही या मनाची स्थिती पहाल तर समुद्रांतून एखाद्या मोठ्या लाटेसरसें लांब किनाऱ्यावरील डबक्यांत जाऊन पडलेल्या माशाप्रमाणेंच होय. त्यास तेथें यथेच्छ विहार करावयास न सांपडून वरून जरी सूर्यकिरणांचा ताप सहन करावा लागत असतो, तरी त्या ठिकाणावरील त्याची आसक्ति तिळप्रायही कमी झालेली नसते. त्याचप्रमाणें चिदानंद सागरांतून ईशमायारूप लाटेनें नानायोनी कर्दमामध्यें झुगारून दिलेले

जीव त्या अत्यंतिक सुखाच्या अभावीं अत्यल्प अशा विषयोपभोगांतच निमग्न होतात. परंतु या अशाश्वत सुखोपभोगांत खऱ्या सुखाची माधुरी कोठून असणार आहे! अर्थात नाहींच.

त्वमल्पसुखखिन्नं वै मनोमीनं पुनश्चयः ।
स्वाधिष्ठाने परानन्दे योजतेत्स सुखीनरः । ५८ ।

म्हणून त्या कर्मानुरूप अत्यल्प असें विषयसुख प्राप्त झालेल्या मनोमीनास शमदमादि साधनांच्या सहाय्याने परमानंद सुखसागराचे ठायीं मोठें धैर्य देण्याचा प्रयत्न करावा. म्हणजे अनात्मध्यास सुटून स्वस्वरूपाचे ठिकाणीं रतञात्साता निरोधसमाधिच्या द्वारें त्यास परम अशा स्वात्मसुखाची प्राप्ति होईल; व ही प्राप्ति ज्यास झाली त्याच पुरुपास खरा सुखी म्हणोवे. अथवा जो सुखी तोच पुरुप या संज्ञेस पात्र, कारण कृतकृत्य असा तोच झालेला आहे. जो पुरुप स्वान्तःकरणास हें सुख प्राप्त करून देत नाहीं तो अति निर्दय म्हणावयाचा.

" बलीवर्दमिवामग्नं मनोमदन पल्वले ।
अलूनशीर्णावयवंबलाद्रामसमुद्धरा " १ ॥ योगवासिष्ठ.

जरामरणादि क्लेशांमुळें खिन्न झालेल्या मनाचें उद्धरण करण्याविषयींची चिंता ज्यास तिलमात्रही उत्पन्न होत नाहीं त्या पुरुपास नर ही संज्ञा देण्यापेक्षां नराधम म्हटलेलें बरें.

चित्तंचित्पूर्णमुत्पन्नं वियत्पूर्णो यथा घटः ।
पश्चात्स पूर्यते धान्यैस्तथाऽनात्मकृतैर्मनः ॥ ५९ ॥

आतां हें स्वात्म सुख चिरकाल टिकणारें आहे एवढेंच नसून तें मनामध्यें स्वाभाविकपणें निरंतर वास करीत असतें. एखादा घट उत्पन्न होण्याचा मात्र अवकाश कीं, वियत् ह्मणजे आकाशाचें (पोकळीचें) त्याचे ठायीं अधिष्ठान झालेंच. त्याचप्रमाणें चित्त हें उत्पत्ति समयींच चैतन्यपूर्ण असें असतें. रांजण पाणी, किंवा धान्य, यांनीं भरलेला असतो खरा; पण हे पदार्थ सर्व त्यांत समाविष्ट झालेले आगंतुक समजले पाहिजेत; वियत् ह्मणजे आकाश हें मात्र स्वाभावीक होय कारण जल किंवा धान्य हीं ओतून टाकिलीं असतां नाहींतशीं होणारीं आहेत, पण आकाश आपली जागा कधींही सोडणारें नाहीं. तद्वतच देहेंद्रियांकडून घडलेल्या धर्माऽधर्मानें प्राप्त झालेल्या सुखदुःखानें मन जरी पूर्ण भरलेलें असतें तरी हें सुखदुःख केवळ औट घटकेचेंच होय. स्वात्मसुख जें आहे तें मात्र स्वाभावीक असून चिरकाल टिकणारें असें आहे. तें मिळविण्यास खरा उपाय ह्मटला ह्मणजे चित्तनिरोध हाच होय. चित्तनिरोधावांचून वासनांचा क्षय होत नाहीं, व वासनांवर जय मिळविणें ह्मणजे मोक्ष मिळविणेंच होय हें मागें सांगितलेंच आहे. सर्वत्र ब्रह्मच आहे अशी पक्की भावना होऊन सर्व मौल्यांचा एकदां लय झाला म्हणजे वासनाही पण उरणार नाहींत. अशाप्रकारें सर्व वासनांचा लय एकेठिकाणीं लावून स्वस्थ समाधिद्वारा हें सुख मिळविण्याचा प्रयत्न करीत असावें.

**समाधिमन्तराप्यस्ति सुखं ते कीदृशं वद ।**
**निषेधस्य विधेश्चापिवर्जनं परमं सुखम् ॥ ६० ॥**

पशवः सुखिनस्तस्मात् धर्माऽधर्म विसर्जनात् ।
भ्रांतिजन्म फलाभावस्तेषां ते नास्तिकाश्च नः ॥ ६१ ॥

आतां या समाधिवर ही जे शंका तुला जर विश्वास नसेल तर मग तुझें हें दुसरें सुख प्राप्त करून घेण्याचें कोणतें अत्यद्भुत साधन आहे तें तरी कळूं दे " विधिनिषेध न बाळगता मन मानेल तसें आचरण करणें यातच परमसुखाची प्राप्ति आहे, निषिद्ध पदार्थांचें सेवन करणें किंवा दररोज संध्या वंदन करून नाक मुठींत धरून प्रहर प्रहर ध्यानस्थ बसणें यात कांहीं एक अर्थ नाही, विधिनिषेध पाळणें हें केवळ अज्ञान आहे, देहेंद्रियाकडून घडलेल्या कर्मांचा कर्ता भोक्ता मी आहें, त्या समजुतीनें त्यावेळीं हातून झालेल्या पापाच्या परिहारार्थ कांहीं तरी पुण्याचरण घडलें पाहिजे असें जें आपलें आग्रहपूर्वक नित्य सांगणें आहे, तें केवळ अज्ञान मूलक आहे कारण मनास किंवा बुद्धीस ह्मणून जें जें दृश्यमान् होतें तें तें सर्व खोटें आहे असा दृढ संकल्प असल्यावर मग पापाचें अगर पुण्याचें कर्तृत्व आपणाकडे मुळी येतच नाही. आमचे मतें दृश्यमान् तेवढें मिथ्या असा पूर्ण निश्चय होणें यांतच सर्व सुख आलें. अशा रीतीनें आपल्या कर्तृत्वाविषयींचा व जगाविषयींचा खोटेपणा कळून आला ह्मणजे वासनाक्षय होण्यास मुळींच अवधी नाहीं; व वासना-क्षय झाला ह्मणजे मग आपल्या ह्मणण्याप्रमाणेंच सर्व सुखप्राप्ति अनायासेंच झाली, मग बाह्य दुःख सहन करणेंही दुर्घट नाही. " होय. उत्तर तर प्रथमदर्शनी मोठें सयुक्तिक दिसत आहे. आतां तें कसोटीस किंपत उतरतें आहे तें पाहूं. स्वसुखलाभ घेण्याचे पूर्वींच यथेच्छाचरणामध्यें तुला

गोडी वाटूं लागली आहे तर मग गोगर्दभादि पशूंना-देखील तुजपेक्षां सुखी ह्मणावें लागतें. कसें तें पहा. पशूंना विहिताविहित कर्मांचा धरबंध नसल्या कारणानें या जन्मींचे त्याचे कृत्याबद्दल त्याना कोणत्याही प्रकारचें फल भोगावें लागत नाहीं पण तुझी गोष्ट तशी नाहीं. तुला नरजन्म प्राप्त झाला असल्या कारणानें या जन्मीं तुझे हातून पुण्याचरण घडलें असेल तर ठीकच आहे नपेक्षां पाप झालें असल तर मात्र तें जन्मांतरीं बाधक झाल्या वांचून रहावयाचें नाहीं. आता सर्व मिथ्या आहे अशी समजूत झाली ह्मणजे लागलींच चित्तनिरोधा वाचून वासनाक्षय होतो असें ह्मणतोस हें मात्र खोटें आहे. व तत्व-बोध झाला असून जर वासना दूर झाल्या नसल्या तर मग त्या तत्वबोधाचा काहीं एक उपयोग नाही. योगवासिष्ठांत ह्मटलें आहे कीः—

“ बुध्वाप्यत्यन्त वैरस्यं यः पदार्थेषु दुर्मतिः ।
बध्नाति वासनां भूयो नरो नासौ स गर्दभः ॥ १ ॥

सदरहूप्रमाणेंच पंचदशीमध्येंही असा उल्लेख सांपडतो की;—

तत्वं बुध्वापि कामादीन्निःशेषं न जहासिचेत् ।
यथेष्टाचरणं ते स्यात् कर्मशास्त्राति लंघिनः ॥ १ ॥
“ बुध्याद्वैत स तत्वस्य यथेष्टाचरणं यदि ।
“शुनां तत्वदृशां चैव कीं भेदोऽशुचि भक्षणे ॥ २ ॥
“ बोधात्पुरा मनोदोष मात्रात्क्लिश्नस्यथाधुना ।
“ अशेष लोक निन्दा चेत्यहोते बोध वैभवम् ॥ ३ ॥

" विद्वराहेण तुल्य त्वं माकांक्षीः तत्वविद्भवान् ।
" सर्वथा दोष संत्यागाल्लोकैः पूज्यस्त्वदेववत् ॥ ४ ॥

एवढा हा वरील आमचे विधानास दिलेला आधार बस आहे. यावरूनच आपली पूर्ण खात्री होऊन चुकेल कीं नुसता तत्वबोध होऊन कांहीं उपयोगाचें नाहीं. त्या बरोबर वासनाक्षयही झाला पाहिजे. आतां या पाखंडी लोकांचें वैराग्य कोणत्या प्रकारचें असतें तें पाहूं.

साधुर्विरागतो धन्यो विरागस्तव शाब्दिकः ।
साधोरसत्सुखे स स्यात् सत्सुखेऽप्यस्त्यहो तव ।६२।

बाबा ! शाब्दिका, तुझें वैराग्य ह्मणशील तर साधु-संताच्या वैराग्यापेक्षाही कांकणभर उग्रतर ह्मटलें पाहिजे. साधु लोकांचें काय ? त्यांचे ठायीं इंद्रिय सुखाविषयींच काय ती अनासक्ति असते. तुझेकडे पहावें तर तुला आत्म-सुखाची ही परवा नाहीं ! एकंदरींत तुझें वैराग्य धन्य खरें ! केवढी तुझी ही निस्पृहता ! अहो ! मुमुक्षु लोक काय तें ऐहिक सुख सोडतात, आत्मसुखा-करितां कितीं तरी हपापलेले असतात. इकडे तूं तर आत्मसुख, स्वर्गसुख किंवा ऐहिकसुख या तिहींतून कोणा एकाचीही लेशमात्र देखील अपेक्षा करीत नाहींस ! कारण पहा. चित्तनिरोध न झाल्यामुळें—अर्थात तुझ्या वैराग्यतेच्या प्रभावानें तूं त्या भरीस न पडल्यामुळें—आत्म-सुख तुला मिळत नाहीं—अथवा तें तूं मिळवीत नाहींस—दुसरें स्वर्गसुख स्वधर्माचे ठायीं तुझी विलक्षण निस्पृहता असल्या कारणानें त्याची ही तूं इच्छा धरीत नाहींस व तिसरें ऐहिक सुख तेंही तुला शिष्टाचाराच्या विरुद्ध नावें

लागलें असल्या कारणानें तूं चार चौघांस अप्रिय होतोस, ह्मणून मिळत नाहीं. सारांश विरक्त हें नांव तुलाच खरो-खर फार शोभतें !!!

असल्या प्रकारचे शाब्दिक ह्मणजे पाखंडवादी पुष्कळ असतात. त्यांचें खरें स्वरूप अद्यापही समजलें नसल्यास खालीं पहाः—

ईदृशानुभवाःकेचित् गृहस्था न्यस्तसत्क्रियाः ।
केचित्कर्माणि कुर्वन्ति सदाचारास्तथापरे ॥ ६३ ॥
केचित्संन्यासिनःसन्ति त्यक्तदण्डास्तु केचन ।
दुर्मार्गगामि नो ह्येते वर्ज्जनीया मुमुक्षुभिः ॥६४॥

कित्येक वर वर्णिलेल्याप्रमाणें केवळ शब्दपांडित्य करून विहिताचारांस फांटा देणारे झाले, ते आमी जीव-न्मुक्त झालों असें ह्मणून कर्मत्याग करितात. दुसरे वि-हित कर्में आचरितात परंतु तेवढ्यानेंच आतःप कृतकृत्य मानून चित्तनिरोध करण्याचा यत्न करीत नाहीत. आणि यांहूनही निराळे कांहीं शाब्दिक आहेत ते "तत्त्वमसि" आदिकरून महावाक्यांवर विचार करणें वगैरे सदाचारसं-पन्न असूनही स्वशमदमादि साधनाच्या सहाय्यानें स्वात्म-सुखार्थ परिश्रम करीत नाहींत. त्याचप्रमाणें कित्येकांनीं संन्यासदीक्षा धारण केलेली असते. त्यांनीं बहुधा दंडा-दिकरून जीं त्यांचीं उपलक्षणें असतात त्यांचा त्याग केलेला असतो. हे सर्व दुर्मार्गगामी लोक होत, यांचा सूज्ञांनीं अव्हेर करावा. भलत्याच रस्त्यानें जाणाऱ्यांचा सहवास केल्यानें ज्याप्रमाणें आपल्या सर्व वित्तानें चोरांचे हातून हरण होऊन प्रसंगवशात् देहासही त्रास भोगावा

लागतां त्याचप्रमाणें ह्या पाखंडीलोकांचा सहवास केल्यानें मुमुक्षुलोक आपल्या सदाचारद्वारा मिळविलेल्या परमपुरुषार्थ साधनांना अंतरतात; ह्मणून या असल्या बोलघेवड्यांपासून फार दूर रहण्याची खबरदारी घ्यावी.

अविरागाद्गृहस्थानामुपेक्ष्यत्वं भवत्वहो ।
कथं परमहंसानां तथात्वमिति चेच्छृणु ॥ ६१ ॥
तेषां परमहंसानां धर्माः श्रुतिषु वर्णिताः ॥
तत्राथेत्यादिभिर्वाक्यैर्ज्ञायतां योगिनां स्थितिः ॥ ६१ ॥

यावर आतां कोणी अशी शंका घेईल की, गृहस्थाश्रमी अशा पाखंडवादी लोकांपासून अलग रहाण्यास आपण सांगितलें तें एक रास्त झालें; पण ज्यानीं परमहंसवृत्ति धारण केली आहे अशा निस्पृह ज्ञाननिष्ठांचाही अव्हेर करण्यास आपण सांगतां हें मोठें आश्चर्यच नव्हे काय? खरें आहे. पण हे संन्यासी परमहंस या पदास मुळींच योग्य नसतात कारण त्यांना उचित असे जे धर्म, ते ते पाळीत नाहीत. आतां हे धर्म कोणते हें संक्षिप्तरीतीनें सांगितलें पाहिजे.

प्रथमतः अंगीं तीव्रतर वैराग्य बाणलें असेल तरच परमहंस संन्यासदीक्षा घेण्यास पुरुषास अधिकार पोहोंचतो. एरवीं नाहीं; आणि हा संन्यासही दोन प्रकारचा आहे. एकाला **विविदिषा** संन्यास आणि दुसऱ्यास **विद्वत्संन्यास** असें ह्मणतात. साधनसंपन्न असे लोक केवळ तत्वज्ञान प्राप्त करून घेण्याकरितां जो संन्यास घेतात त्यास विविदिषा संन्यास अशी संज्ञा आहे; व जीवन्मुक्तिप्राप्त्यर्थ जो संन्यास धारण केलेला असतो त्यास विद्वत्संन्यास असें

ह्मणावें. पैकीं पहिला जो आहे तो जरी पूर्वजन्मीं धारण केलेला असला तरी त्यापासून होणारी फलश्रुति जें ज्ञानोपार्जन तें अन्यजन्मींही होऊं शकतें. याशिवाय आतुर-संन्यास ह्मणून एक भेद आहे. हा संन्यास मनुष्य आतुर ह्मणजे फार आजारी असेल तेव्हां घेतात; पण तो घेतानाही मनसावाचा सर्व गोष्टींचा त्याग केला पाहिजे. खरें वैराग्य उत्पन्न झाल्याशिवायच जर हा धारण केला तर त्यापासून केव्हाही फायदा नाहीं. आतां जीवन्मुक्ति प्राप्त करून देणारा जो विद्वत्संन्यास त्याचें लक्षण काय आहे? तर योगयुक्त असे जे परमहंस त्यांनाच विद्वत्संन्यासी ह्मणावें. केवळ त्रिकालज्ञान किंवा आकाशगमनादि योगाचे ठिकाणीं आसक्ति असून भागत नाहीं; कारण त्यामुळें परमपुरुषार्थ प्राप्त होत नाहीं. त्याचप्रमाणें फक्त तत्वविवेकानें ऐश्वर्याचे ठायीं असलेली असारता समजण्यानें ही कृतार्थता होत नाहीं, ब्रह्मविद्या अवगत झाली आहे या भरांत विधिनिषेधाचें उल्लंघन मात्र होतें; पण योगी असून परमहंसही जो आहे त्याचे ठायीं हे दोन्हीही दोष नसतात. असे जे परमहंस योगीराज त्यांचा व्यवहार मार्गही अत्यद्भुत असतो. त्या योगसिद्धांनीं दंडकमंडलु, कोपिनादि आश्रमचिन्हांचाही त्याग केला पाहिजे! विविदिषु परमहंसां पाशीं ज्या प्रमाणें ही आश्रमचिन्हें असणें अत्यावश्यक आहे त्याच प्रमाणें परमहंसयोग्यापाशीं हीं नसली पाहिजेत; कारण तीं असण्यापासून योगाभ्यासामध्यें मात्र व्यत्यय यावयाचा. आता आच्छादनादि नसल्यामुळें त्याचें शीतनिवारण वगैरे कसें होत असेल अशी शंका जर कोणास असेल तर ती बरोबर नाहीं. आपल्या सर्व चित्तवृत्ति

ज्यानीं पूर्णपणें आंवरून घेतल्या आहेत त्यांनां शीतोष्णापासून बाधा ती कशी होणार? शीत, उष्ण, सुख, दुःख, मानावमान हे सर्व विकार त्यांना वर्ज आहत. अनेक प्रकारच्या खेळांमध्यें गुग झालेल्या बालकांना उन्हाळा असो, पावसाळा असो, अगर हिवाळा असो कशाची ही पर्वा नसते. तीच स्थिती यांची होय. मानावमान ह्मणजे दुसऱ्यानें एखाद्या विषयी दाखविलेला सत्कार किंवा तिरस्कार. तो ते अगदींच लक्षांत आणीत नाहीत. कारण आत्म्याव्यतिरिक्त दुसरा पुरुषच ज्या योग्यास माहीत नाहीं त्याचा मानावमान तो कसा होणार! शत्रू मित्र रागद्वेषादि द्वंद्व भावास त्यानें कधींच फांटा दिलेला असतो. क्षुत्पिपासा, शोक, मोह व जरामरण हे जे अनुक्रमें प्राण, मन व देह याचे धर्म ते योग्यास वर्ज होत. निंदा, गर्व, मत्सर, दंभ, दर्प, इच्छा, द्वेष, सुख, दुःख, काम, क्रोध, लोभ, मोह हर्ष, असूया, (हेवा) अहंकार वगैरे या सर्व विकारांची व योग्याची कशी ती ओळखच नसते आतां वरील विकारांचें स्वरूप कसें असतें तें संक्षेपतः सांगतों: अनेक जणानी एखाद्याचे काढिलेले जे दोष ती निंदा, अमक्या पेक्षां मी अधीक चांगला ही वृत्ति असणें तो गर्व, फलाणा विद्येनें किंवा धनानें मजपेक्षां अधीक आहे असें वाटून त्याबद्दल मन दूषित होणें हा मत्सर, दुसऱ्याच्या पुढें जपध्यानादि उघड करण्याची इच्छा तो दंभ, एखाद्यावर कुत्र्याप्रमाणें तुटून पडावेंसें वाटणें तो दर्प, कनक व कांता असावी अशी जी वृत्ति होते ती इच्छा, शत्रूंचा वध करावा अशी जी वृत्ति होते तो द्वेष, द्रव्यादि अनुकूल असल्यावर जें मनाला स्वास्थ्य वाटतें तें सुख, याच्याच उलट जी वृत्ति तिला दुःख

ह्मणावें, अनेक स्त्रियांची प्राप्ति व्हावी अशी इच्छा उत्पन्न होणें हा **काम**, प्राप्त झालेलें धन परत करावेंसें न वाटणे तो **लोभ**, चांगलें वाईट व वाईट चांगलें असे भासणें तो **मोह**, इच्छित कार्य झालें ह्मणजे मनोवृत्ति तल्लीन होऊन जी मनाची सुखदायक स्थिती होते तीस **हर्ष** ह्मणावें, दुसऱ्याच्या गुणामध्यें दोष काढावेसें वाटणें ही **असूया**, अमुक माझें तमुक माझें आहे असें वाटणें त्यास **अहंकार** ह्मणावें.

या सर्व वर सांगितलेल्या निंदादि विकारांपासून योगी अगदीं अलिप्त रहातो. देह विद्यमान असतां हा एवढा परित्याग त्याचे करून होणें केवळ असंभाव्य आहे अशी शंका जर कोणास असेल तर ती निराधार आहे. इतके दिवस हा देह माझा अशी जी योग्याची समजूत होती ती आतां त्यानें देह व आत्मा याचें पृथक्करण केल्यापासून नाश पावून तो ( देह ) केवळ कुणपवत् ह्मणजे प्रेतवत् आहे असा त्याचा पक्का ग्रह झालेला असतो. एखादा श्रद्धाळु ज्याप्रमाणे स्पर्शभीतीनें शवा पासून दूर उभा राहून त्याजकडे पहात असतो त्याच प्रमाणे योगी तादात्मतेमध्यें भ्रांति उत्पन्न होइल या भयानें मोठी सावधागिरी राखून देहेंद्रियपाशापासून अगदीं अलिप्त राहण्याची खबरदारी घेतो.

अशा प्रकारचे हे विद्वत्संन्यासाचे अनेक कठिणतर असे धर्म उपनिषदांत वर्णिले आहेत त्यांचा थोडा विचार केला.

**जीवन्मुक्ति सुखावाप्तैश्चित्तविश्रान्तिकामिनाम् ।**
**मोक्तो दण्डादि संत्यागो नैवासंयतचेतसाम् ।६७।**

जीवन्मुक्ति मिळवून आत्मसुख प्राप्त्यर्थ अनेक कर्मवासनांनी मन विक्षिप्त झाल्यामुळें संसाराविषयीं ज्यांचे चित्तास अगदीं पूर्ण वीट येऊन गेला आहे अशा परमहंस विद्वत्संन्याशांनाच फक्त दंडादि आश्रम चिन्हांचा त्याग करणें यु‍क्त आहे. परंतु ज्यांनीं अद्याप आपल्या मानसिक वासनांचें पूर्ण आकलन केलें नाहीं त्या पाखंडवादी संन्याशांनी-ज्यांना संन्यासीपणाचा केवळ आळ मात्र आला आहे-त्यांनीं आपल्या आश्रम चिन्हांचा त्याग करावा असें शास्त्रांत कोठेंही सांगितलेलें नाही. केवळ मन चाहेल त्याप्रमाणें दंडकमंडलु ग्रहण करावीत किंवा टाकून द्यावीत हा धर्म नव्हे. सारांश सांगावयाची गोष्ट काय तर ह्या असल्या सर्व खऱ्या हकीगती ठाऊक असूनही, केवळ दांडगाईनें मनसोक्त वर्तन करणाऱ्या पाखंडी जनांपासून चार पाउलें दूर असावें आणि आपल्या हितार्थ प्रथमतः स्वधर्माप्रमाणें कर्माचरण करावें.

स्वकर्मणा विनानैव चित्तशुद्धिः कचिन्नृणाम् ।
तां विना न विरक्तिःस्याद्धरेर्भक्तिस्तु दुर्लभा ।६८
विनाभक्तिं विरक्तिं वा न मनो जेतुमर्हसि ।
न तज्जयं विना कश्चित्पुमान्मुच्यत बन्धनात् । ६९ ।

आपल्या वर्णाश्रमाप्रमाणें आपणांस उचित असें कर्माचरण केल्यावांचून विषयवासनामलाचें क्षालन व्हावयाचें नाही, आणि चित्तशुद्धि झाल्याशिवाय अंतर्यामी वैराग्यतेचा अंकुर उत्पन्न व्हावयाचा नाहीं. हरि-कीर्तनाचे ठायीं प्रेम उत्पन्न होऊन जगदीश-चरणारविंदीं भक्ति जडणें ह्मणजे केवळ पूर्वसुकृतोदयच ह्मणावयाचा. या वि-

रक्तीचा किंवा भक्तीचा आश्रय अत्यावश्यक केला पाहिजे, त्या शिवाय या अज्ञानरूप संसारांतून जीवांची सुटका होणें कठीण आहे. योगवासिष्ठांत ह्मटलें आहेः—

" एक एव मनोदेवो जेयः सर्वार्थ सिद्दिदः ।
अन्यत्र विफलः क्लेशः सर्वेषांत्रतज्जयंविना । १ ।"

ह्मणून मूळ मुद्दा काय तर सर्वेशा परिपूर्ण करणारें जें मन तें साध्य करून ध्यावें. या मनोदेवास प्रसन्न करून घेतलें ह्मणजे मग सर्व कांहीं तेव्हांच वश होतें. एकदां आपल्या मनावर आपला पूर्ण अम्मल बसला ह्मणजे मग सर्व देव ही प्रसन्न करून घेण्यास मुळींच अवधि लागावयाचा नाहीं.

इतकें सामर्थ्यवान् जें मन तें साध्य करणेंही मोठें दुर्घट आहे. मनावर जय मिळविणें ह्मणजे अगदी दुर्जय व भयंकर अशा शत्रूस पादाक्रांत करण्या सारिखेंच आहे. श्रीमद्भागवतांतही असाच अभिप्राय आहे. मनोजयाप्रमाणें दुसरें दुर्घट योगसाधन नाहीं. ह्मटलें आहे, "**परोहियोगो मनसः समाधिः** ॥" दानादि सर्व धर्म त्यापुढें कांहींच नाहींत; ह्मणून सर्वत्रांनीं आस्ते आस्ते आपल्या उच्छृंकल अशा मनोवासना आकलन करण्याची सं.य करीत असावें.

**मनोजयं विनानैव संसारोपशमो नृणाम् ।**
**तज्जयो ज्ञानयोगेन भक्त्यावाऽयत्नतो भवेत् ॥ ७० ॥**
**मनः शैलोऽति दुर्लंघ्यो यतमानैर्नरैरपि ।**
**यस्य प्रान्तेस्वयं ज्योतिरास्ते देवः सनातनः ॥ ७१ ॥**

मनोवासना स्वाधीन झाल्यातरच जन्ममरणादि संसार-क्लेशांतून प्राण्यांची सुटका होणार आहे. हा मनोजय मिळविण्याचा एक मार्ग ह्मटला ह्मणजे ज्ञानयोग हा होय. सद्गुरूपदिष्ट मार्गानें आत्मानात्म विचार करून मनननिधिध्यासाचा परिपाक झाल्यावर संकल्पविकल्पांचा परित्याग करावा ह्मणजे मनोजय झाला. आतां ज्ञानयोग्यांनाही परम दुःसाध्य असा हा मनोजय आपणा अज्ञ जनांना प्राप्त होऊन आपली संसाराच्या रहाटगाडग्यांतून सुटका कसची होते अशी चिंता आपणास पडली असेल तर मनोजयास दुसराही एक मार्ग आहे. तो कोणता ह्मणाल तर, भगवद्भक्ति. भगवद्गुणानुवाद ऐकणें किंवा स्वतः गाणें ही जी एकप्रकारची भक्ति सांगितली आहे तिच्या आश्रयानें चित्तनिरोधश्रम केल्या वांचून अनायासेंच ईश्वर-प्रसाद प्राप्त होऊन साता अंतःकरण एकनिष्ठ होतें व असें अंतःकरण एकनिष्ठ होणें ह्मणजेच मनोवासनांवर जय मिळविणें होय. त्याचप्रमाणें भक्ताना वैराग्य प्राप्त होतें तेंहि या ईश्वरभक्तिपासूनच. ह्मटलें आहेः—

“ शृण्वन्सुभद्राणि रथाङ्गपाणेर्जन्मानिकर्माणि च यानिलोके । गीतानि नामानि तदर्थकानि गायन्विलज्जोविचरेदसंगः ॥ १ ॥ ”

हरि-गुण-श्रवणापासून उत्पन्न झालेल्या प्रेमभरांत भक्तजन लोकलज्जा वगैरे सर्व गडाळून मोठ्या आनंदातिरेकानें नाचतात, उडतात, अनेक प्रकारचे हावभाव करितात आणि ‘ विठ्ठल विठ्ठल ’ या आरोळींत गर्क होऊन हातांतील टाळ-विण्यांचे अनेक नाद काढितात. त्यावेळीं

त्यांना आपल्या स्थितीची, बायकापोरांची, जनापवादाची वगैरे कशी ती शुद्धीच नसते. अशाप्रकारें वृत्ति तल्लिन होऊन कशाचीही अपेक्षा न उरणें हेंच मनाचें वैराग्य.

हा मनः शैल ह्मणजे मनोरूपी डोंगर शमदमादि साधनेंकरूनही उतरून जाण्यास फार कठीण पडतो. याचे शिखरावर सनातन सच्चिदानंदरूपी सर्व इंद्रियांनाही आपला प्रकाश देणारी स्वयंज्योति प्रकाशमान् झालेली असते. ज्ञान ज्ञेय, ज्ञानगम्य या सर्वांचा वास तेथेंच. सारांश स्वयंज्योतिः जो परमात्मा त्याचें स्थान हें हृदय ह्मणजे मनच होय. अन्यवृत्तिपासून तें दूषित न होऊं देण्याची खबरदारी ठेवावी. तें शुद्ध व पवित्र अशास्थितींत राहिलें तरच स्वच्छ उदकांत दिसणाऱ्या सूर्यबिंबाप्रमाणें त्यामध्यें आत्मस्वरूप दृश्यमान् होईल.

---

## प्रकरण सहावें.

# भक्तिमार्ग व ज्ञानमार्ग.

तत्प्राप्तये नृणामत्र द्वौ मार्गौ सनातनौ ।
तयोरेको ज्ञानमार्गो विरक्तस्यापि दुर्गमः ॥७२॥
शमादि साधनैर्यस्य समाधौ सुस्थिरं मनः ।
स एव लभते ज्ञानं नान्यथातेऽतिदुर्गमः ॥ ७३ ॥

आत्मसुख प्राप्तीचे दोन राजमार्ग सांगितलेले आहेत. पैकीं पहिला ज्ञानमार्ग हा होय. पण तो अति विरक्त अशा काम-

निर्मुक्त जनांच्याच उपयोगाचा आहे. संसारामध्यें गुंतलेल्या गृहस्थ लोकांना तो दुर्गमच होय.

" निर्विण्णानां ज्ञानयोगो न्यासिनामिह कर्मसु "

असें पूर्वीच सांगितलें आहे. आतां त्याचें इतकें दुर्गमत्व कम तें पहा. प्रथमतः शमदम उपरांत तितिक्षा, श्रद्धा व समाधान ही जी साधनसंपत्ति ती प्राप्त करून घेतली पाहिजे. ह्या साधनसंपत्तीचें श्रीशंकराचार्य वर्णन करतात—

सदैव वासना त्यागः शमोऽयमिति शब्दितः ।
निग्रहो बाह्य वृत्तीनां दम इत्यभि धीयते ॥ १ ॥
विषये भ्यः पर वृत्तिः परमोपरतिर्हि सा ।
सहन सर्व दुःखानां तितिक्षा साशुभामता ॥ २ ॥
निगमाचार्य वाक्येषु भक्तिः श्रद्धेति विश्रुता ।
चित्तैकाग्र्य च सल्लक्ष्ये तत्समाधानमिति श्रुतम् ॥ ३ ॥
ब्रह्मैवास्मीति सद्वृत्त्या निरालम्ब तया स्थितिः ।
ध्यानशब्देन विख्याता परमानन्ददायिनी ॥ ४ ॥

तर ही शमदमादि साधनें प्राप्त होऊन ज्याचें मन तमोगुणानें आवरण अथवा रजोगुणानें केलेला विक्षेप यास फाटा देऊन, केवळ सत्वगुणविशेषानें अगदीं निर्मल होत्सातें आत्मस्वरूपाचे ठायीं निश्चळ होऊं शकतें, त्या पुरुषासच ज्ञान प्राप्त होतें व त्याच्याच अंतःकरणवृत्ति ब्रह्माकार होतात. वृत्ति ब्रह्माकार होणें हीच ज्ञानसंज्ञक समाधि होय. योगवासिष्ठांत वर्णिलें आहेः—

" ब्रह्माकार मनोवृत्तिप्रवाहोऽहं कृतिं विना ।

संप्रज्ञातः समाधिः स्यात् ज्ञानाभ्यास प्रकर्षतः "

अशाप्रकारें योगाभ्यासशीलासच ज्ञानभावन होणारें आहे. वर सांगितलेली साधनेंच जर प्रथम साध्य झालीं नाहींत तर मग ज्ञानभावनाची गोष्ट लांबच राहिली. सारांश हा ज्ञानमार्ग जो आहे तो फार दुस्तर असा आहे. सर्वारंभीं तो मनःशैलच चढून जाण्यास किती प्रयास पडतात! कोठें थोडासा मार्ग आक्रमून गेलें नाहीं तोंच कामक्रोधादि अनेक व्याघ्र भुजंगांचे भयानें चित्त व्याकूळ होऊन आतां पडतों की मग पडतो असें होऊन जातें. ज्ञानमार्गानें जाण्यास आरंभ करावा तर प्रथमतः मनाच्या क्षिप्त, विमूढ व विक्षिप्त अशा तीन प्रकारच्या स्थिति होत असतात. ही स्थिति मनःशैलाच्या बहिर्भागींच होते, कांहीं पुढें गेल्यावर परितन भाग लागतो. हीच एकाग्र भूमि होय. ह्या ठिकाणीं गेल्यावर संप्रज्ञात समाधि लागून स्वात्मदर्शन होतें; व येथून खालीं पडण्याची सहसा भीति नसते. अविग्भूमि या ठिकाणाहून मात्र अधःपतनाचें बरेंच भय आहे; परंतु एकदा ह्या भूमीवरून थोडेसें पुढें चालून गेलों ह्मणजे पूर्णपणें निभावलों. एकाग्रता परिपाकानें निरोधभूमीपर्यंत मजल येऊन पोंचली ह्मणजे अगदीं निर्धास्त झालें. येथें आत्मा अगदीं एकाकार होऊन जातो. निजानंदांत मग्न होत्साता त्यास बाहेरील जगाची ओळखही रहात नाहीं.

अशा प्रकारचा हा ज्ञानमार्ग विरक्त लोकांनाही फार कष्टसाध्य आहे. मग अविरक्त अशा लोकांचा तो काय पाड! प्रत्यक्ष भगवंतांनींच ह्मटलें आहेः—

"असंशयं महाबाहो मनो दुर्निग्रहं चलम् ।
अभ्यासेन तु कौन्तेय वैराग्येण च गृह्यते ॥ १ ॥
"असंयतात्मना योगो दुष्प्राप इति मे मतिः ।
वश्यात्मना तु यतताशक्यो वाप्तुमुपायतः ॥ २ ॥

त्याचप्रमाणें—

"श्रुतिविप्रतिपन्नाते यदास्थास्यतिनिश्चला ।
समाधावचला बुद्धिस्तदायोगमवाप्स्यसि" ॥ ३ ॥

ह्मणून ज्ञानयोगसिध्यर्थ जे भगवदुपासनेचा आश्रय करितात, त्यांना मनोवासनावर जय मिळून आत्मप्राप्तीही निर्विघ्नपणें प्राप्त होते. परंतु जे भगवान् सच्चिदानंद परमेश्वरास न ओळखतां केवळ स्वसामर्थ्यानेंच ज्ञानप्राप्ति करून घेण्याचा प्रयत्न करतात ते अर्ध्या वाटेवरच अडखळून पडतात; ह्मणून ज्ञानप्राप्त्यर्थ प्रयत्न करणें तो भगवद्भक्तीच्याच आश्रयानें करावा.

द्वितियो भक्तिमार्गस्तु सुगमः सर्व देहिनाम् ।
सहायो भगवान्यत्र भक्तानां वर्ततेऽनिशम् ॥७४॥
योगैश्वर्यमिदं भक्तैरनुभूतं हरेर्यतः ।
भक्ताः प्रियतमास्तस्मान्न तथा ज्ञानिनोऽपि ही ।७५।

आतां आत्मसुख प्राप्तीचा दुसरा मार्ग आहे ह्मणून जें मार्ग सांगितलें, तो भक्तिमार्ग हा होय. हा ज्ञानमार्गाप्रमाणें परम दुर्घट असा नसून सोपानवत् ह्मणजे एखाद्या जिन्याप्रमाणें आहे. शक्ताशक्त लोक जिन्यावरून सहजपणें चढून जाऊं शकतात तद्वतच या भक्तिसोपान मार्गानें

सर्व प्रकारच्या लोकांना जाण्यास सुलभ पडतें. भगवद्गुण श्रवण कीर्तनादि सुगमोपायांनीं शक्ताशक्त, विरक्ताविरक्त सर्व दरजाचे लोक तो मनःशैल अति सुलभ रीतीनें चढून जाऊं शकतात; आणि मग अर्थातच स्वयंप्रकाश अशा आत्मज्योतीचें स्वरूपदर्शन त्यांना लवकरच घडतें. अध्यात्मरामायणांत कौसल्येप्रत श्रीरामांनीं हेंच सांगितलें आहेः–

“ मार्गास्त्रयो मया प्रोक्ताः पुरा मोक्षाप्तिसाधकाः ॥
कर्मयोगो ज्ञानयोगो भक्तियोगश्चशाश्वतः ॥
तेषांतु सुलभो मार्गो भक्तियोगः सुपूजितः ॥ ”

आतां हा भक्तिमार्ग इतका सुलभ असण्याचें कारण काय ह्मणाल तर शरणागत अशा आपल्या भक्तजनांना साह्यकर्ता प्रत्यक्ष भगवान् परमात्मा हाच असतो. त्यांची सर्वतोपरी चिंता त्यालाच. एकनिष्ठपणें त्यास शरण मात्र गेलें पाहिजे.

“ तेषामहं समुद्धर्ता मृत्यु संसारसागरात् ”

असें प्रत्यक्ष श्रीभगवानांचेंच वचन आहे.

दुसरेपक्षीं जगदुत्पत्त्यादि सर्व कांहीं केवळ त्या सर्व नियंत्या परमेश्वराचीच माया आहे, हें त्यांना पूर्णपणें कळून चुकलेलें असतें. हरि हा जगदीश्वर असून त्याची सर्वांनीं सेवा केली पाहिजे, तो सर्वनियंता आहे व त्याचें आराधन केलें असतां भवार्णवांतून आपणांस तो सहज तारून नेईल असा पूर्ण विश्वास मनाचे ठायीं बाणून ते त्याचें स्तवन पूजन करितात; ह्मणूनच हे भक्त लोक

त्यास परम प्रीय होतात. त्याचप्रमाणें निऱ्यानित्य विचारसंपन्न निर्गुणोपासक कांहीं कमी दर्जाचे असतात असं नाहीं; परंतु सर्व नियंता जो परमेश्वर त्याविषयीं व त्याचे मायेविषयी, ते अनादर प्रदर्शीत असल्या कारणानें ते त्यास अप्रीय असे होतात, कारण उघडच आहे. केवळ ज्ञानेच्छु लोकांचें ईश्वराचे ठिकाणीं प्रेम मुळींच नसतें व ह्मणून तो त्यांचे संबंधानें अगदीं उदासीन असतो. तेंच भक्तजनाचीं अंतःकरणें त्याजविषयींच्या प्रेमातिरेकानें अगदीं ओथंबलेलीं असतात. मग त्यानेंही त्यांचा इतका आदर कां करूं नये?

**निर्गुणोपासका धन्या ध्यान निर्ध्दूत कल्मषाः।**
**उपेक्षिताः कथं तेन हरिणा करुणात्मना ॥ ७६ ॥**
**सर्वशक्तियुतं विष्णोः स्वरूपं यैरुपेक्षितम्।**
**ब्रह्माभिमानिनां तेषामुपेक्षैवोचिता हरेः ॥ ७७ ॥**

आतां पुन्हां कोणी ह्मणेल कीं, " खरें पाहतां निग्रहीतांतःकरणानें, नित्य शुद्ध व निर्गुण अशा ब्रह्माची उपेक्षा करणारे फार चांगले. निःपक्षपाती व करुणाघन असें आपणास ह्मणविणाऱ्या परमेश्वरानें त्यांची उपेक्षा करावी हें कांही त्यास योग्य नव्हे. निर्गुणोपासकांनींही एकाग्रध्यानाच्या योगेंकरून आपल्या अंतर्यामातील कल्मष धुऊन टाकिलें आहे. असें असतां त्यांची उपेक्षा ईश्वरानें काय ह्मणून करावी?

असा हा प्रश्न विचारणाराना बरा दिसतो. पण विचाराअंतीं यांत कांहींच हांशील नाहीं असें दिसून येईल. धर्मसंस्थापने करितां व सर्व जगाचा उद्धार करण्याकरितां

ज्या परमात्म्यानें रामकृष्णादि अनेक अवतार धारण केले व अशा प्रकारें नाना युक्ति योजून जगाचें रक्षण केलें त्या जगदीश स्वरूपाची उपेक्षा करणारांना चांगल कोणी ह्मणावें? ते ब्रह्माभिमानी नेहमीं आपल्या ब्रह्मज्ञानाच्या तोऱ्यांत असणार! तेच हरि-चरणीं लीन होत नाहींत तर मग त्यानें तरी त्यांजविषयीं आदर कां बाळगावा?

हरिणा निर्गुणेनैव कर्त्तव्यस्तेष्वनुग्रहः।
इतिचेत्तत्र तन्नास्तिह्यनुग्राहकतादिकम् ॥ ७८ ॥
ये यथा मां प्रपद्यन्ते तांस्तथैव भजाम्यहम्।
इत्युक्तिमन्यथाकर्तुं हरिर्नोत्सहते क्वचित् ॥ ७९ ॥

आतां त्यांच्याच (निर्गुणोपासकांच्या) तत्वज्ञाना-प्रमाणें पाहिलें तरी त्यांचें म्हणणें सयुक्तिक ठरत नाहीं. कारण ते बोलून चालून निर्गुणाची उपासना करणार. मग त्या निर्गुणाचे ठायीं अनुग्राहकता कशी येते? "हा उपासक माझी उपासना करीत आहे, याजवर कांहीं तरी अनुग्रह करावा," अशा प्रकारचें अनुग्राह्य आणि अनुग्राहकता (द्वैत) त्या ठिकाणीं मुळींच उरत नाहीं नपेक्षां वैषम्यतेचा दोष उगाच त्याचे माथीं लागावयाचा. कारण, " सर्व फलांचा दाता जो मी त्या मला जन ज्या ज्या मार्गानें भजतील त्या त्या मार्गानेंच मी त्यांच्या मनीषा पूर्ण करून त्याचे इच्छीत हेतु तडीस नेईन." अशी भगवंताची प्रतिज्ञा आहे. तिचे विरुद्ध तो कदापि जाणार नाहीं अशीच एक आणखी भगवदुक्ति आहेः—

" यो यो यां यां तनुं भक्तः श्रद्धयार्चितुमिच्छति।

तस्य तस्याचलांश्रद्धां तामेव विदधाम्यहम् ॥ १ ॥
सतया श्रद्धया युक्तस्तस्याराधन मीहते ।
लभतेच ततः कामान्मयैव विहितान्हितान् ॥ २ ॥"

भक्तिमान पुरुष ज्या ज्या स्वरूपाची ह्मणून आराधना करतो तेंच स्वरूप धारण करून ईश्वरास त्याची मनकामना पूर्ण करावी लागते, असा हा फार पुरातन कालापासून चालत आलेला ईश्वरी नियम आहे असें दिसतें. बाण, रावणादिक यांनीं भोळानाथ शिवस्वरूपाची आराधना केली ह्मणूनच परमात्म्यास त्यांचे इष्ट हेतु शिव-रूपानें तडीस न्यावे लागले. त्याचप्रमाणें ध्रुव पऱ्हादादि वैष्णवांना त्यांच्या इच्छेप्रमाणें विष्णुस्वरूपाचीच प्राप्ति झाली. ह्मणून निर्गुणोपासकांना पुन्हां इतकेंच सांगणें आहे कीं अव्यक्त ब्रह्माची उपासनाकरून तुमचें भागणार नाही. अद्वितीय अशा ब्रह्माचे ठायीं सेव्यसेवक भावाची मुळींच कल्पना चालत नसून त्या कारणानें अनुग्राह्य व अनुग्राहकत्वाचाच संभव तेथें होत नाहीं. ह्मणून निर्गुणो-पासकांनीं आपला हेका सोडून कोणत्यातरी व्यक्त स्वरूपाचीच प्रथमतः आराधना करावी; नाहींतर त्यांचे हातून मनोनिग्रह झाल्यामुळें त्यांना कामक्रोधादिकांच्या पाशांत सांपडून चिरकाळ पावेतों संसारसमुद्रांत खिचपत पडावें लागेल. आता एवढ्यावरून सर्वशास्त्र प्रसिद्ध जी निर्गुणो-पासना ती अगदीं निरूपयोगी ठरते असें मात्र समजू नये, तिचा खरा मार्ग ह्मटला ह्मणजे प्रथम ईश्वराधनाकरून तत्प्रसाद प्राप्तकरून घेतला पाहिजे. ईश्वरप्रसाद एकदां प्राप्त झाल्यावर मग निर्गुणोपासना सिद्ध होण्यास मुळींच अवघी

नको. सारांश कैवल्य पदप्राप्त्यर्थ ईश्वरप्रसादासारखें दुसरें साधन नाही.

**धनार्थी धनलाभाय धनं नो भजते पुमान् ॥**
**धनाढ्यं नरमाराध्य तस्मात्तल्लभते यथा ॥ ८० ॥**
**तथैवेश्वरमाराध्य बुद्धिमांस्तत्प्रसादतः ॥**
**कैवल्य लभतेऽयत्ना न्नतु तत्केवलात्मनः ॥ ८१ ॥**

परंतु एखाद्या मनुष्यास जर धनप्राप्तिकरून घ्यावयाची आहे तर त्यानें धनाढ्य मनुष्याची प्रार्थना अगर सेवा वगैरे करण्याचा योग्य मार्ग सोडून देऊन धनराशींचीच पूजा अर्चा आरंभिली तर त्या पासून व्यर्थ श्रमाशिवाय दुसरें काय निष्पन्न व्हावयाचें आहे? धनिक मनुष्याची मर्जी संपादनकरून घ्यावी तेव्हांच कांही झालें तर व्हावयाचें. त्याचप्रमाणें परमसुखप्रद अशा कैवल्यपदाची जर आपणांस प्राप्तिकरून घ्यावयाची असेल तर त्या सर्वनियंत्या कैवल्यपति परमेश्वराचीच मनोभावानें आराधना केली पाहिजे. बरीं वाईट सर्व कर्में त्यालाच समर्पण करून अनन्यभावें त्या अखिल ब्रह्मांड चालकासच शरण रिघालें पाहिजे. मला ब्रह्मप्राप्तिकरून घ्यावयाची आहे ह्मणून ब्रह्माचीच आराधना करीन ह्मटले तर कसें शोभेल? कोणतीही गोष्ट साध्य कर्तव्य असतां प्रथमतः तिच्या मालकाकडेच संधान बांधावें लागतें. ह्मणून ब्रह्मप्राप्त्यर्थ परमेश्वराराधनच केलें पाहिजे. खरें पाहतां जीवस्वरूप प्रथमपासूनच शुद्ध ब्रह्मरूप असतें. अविद्येच्या योगेंकरून मात्र मध्यंतरीं त्यास विस्मति पडलेली असते. ही विस्मृति दूर केली ह्मणजे

स्वस्वरूपा पासून भ्रष्ठ झालेल्या जीवास पुन्हा आपलें शुद्ध स्वरूप दृग्गोचर होण्यास वेळ नाहीं.

**जातेर्भ्रष्टेन विप्रेण ब्राह्मण्यावाप्तये पुनः**
**नोपास्या ब्रह्मजातिर्वै किंतुपास्योद्विजोत्तमा । ८२ ।**

मनुष्याच्या मनाची प्रवृत्ति प्रथमपासूनच अद्वैताकडे असते. प्रथम तो अद्वैतकर्मी असून पुढें त्याचें मन द्वैताकडे वळतें. कारण लहानपणीं मुलें एकमेकाबरोबर खेळत असतात त्यावेळी त्यांच्या मनांत द्वैतभाव, लेशमात्र तरी असतो काय? मी असा, तो तसा, अशी कल्पना देखील त्यांचे ठायीं नसते. मोठा राजपुत्र असो कीं एकाद्या अकिंचनाचा मुलगा असो. ते परस्परां बरोबर अगदीं ऐक्यभावानें वागत असतात. ते जेव्हां कांहीं मोठे होऊन त्यांना या जगाचें वारें लागतें त्या वेळेसच काय तो आपपर भाव त्यांजमध्यें उत्पन्न होतो; तों पर्यंत कांहीं एक नसतें. तर मूळ मनुष्य अद्वैतकर्मी असतो व पुढें जें द्वैताचें स्तोम माजलेलें असतें तें काढून टाकून पुन्हां अद्वैतकर्मी बनलें ह्मणजे झालें. पण तसें होण्यास उपाय मात्र योग्य मार्गानें झाला पाहिजे समजा एखादा ब्राह्मण शूद्र संपर्कानें किंवा निषिद्धसेवनानें जातिभ्रष्ट झाला आहे व त्यास पुनरपि जातिमध्यें येण्याची इच्छा आहे तर केवळ ब्राह्मणजातीची उपासना करून चालेल काय? अर्थात् नाहीं. आचार संपन्न अशा शास्त्रज्ञ मनुष्याचीच पायधरणी त्यास केली पाहिजे. सदहू प्रमाणेंच ब्रह्मस्वरूपा पासून भ्रष्ट झालेल्या आपणां जीवांस जर पुन्हां ब्रह्म

प्राप्त करून घ्यावयाचें असेल तर त्या सच्चिदानंद परमेश्वराचीच आराधना केली पाहिजे.

जंतुर्नबध्यते येन न भवेत्सोऽस्य मोचकः ॥
बंधमोक्ष करी माया साऽधीना यस्य तं भज । ८३ ।

चिदाकार मायसंबंधशून्य असा जो केवलात्मा त्याच्या योगानें कांही देहेंद्रियप्राणादि यांचे संघात जे जीव ते बद्ध झालेले नसतात. या शरीराचे ठायीं कर्ता, भोक्ता, मी आहे. हा जो अहंकार तोच त्यांना या संसाराचे ठिकाणीं जखडून टाकित असतो. सर्वत्र जी भगवंताची माया पसरली आहे तिच्या मुख्य दोन शक्ति आहेत. एक अविद्या व दुसरी विद्या. अविद्या ह्मणून जी पाहिली शक्ति सांगितली तिच्या योगानें प्राणिमात्र बंधन पावलेले असतात; व दुसरी शक्ति जी विद्या ती स्वात्मज्ञान प्राप्त करून देऊन जीवांची या बंधनापासून सुटका करीत असते. ह्मणून ही माया ज्याची आहे त्या सर्वनियंत्या निग्रहानुग्रहसमर्थ भगवंताचीच आराधना करणें आपणांस भाग आहे त्याचा प्रसाद झाला तरच या संसार्णवांतून तरून जाण्यास आपण समर्थ होऊं. स्कंद पुराणांत सांगितलें आहे:—

“ बन्धको भवपाशेन भवपाशाच्च मोचकः ।
कैवल्यदःपरंब्रह्म विष्णुरेव सनातनः ॥ ”

तात्पर्य, हें जें संसारबंधन आपणां जीवांस प्राप्त झालें आहे त्या पासून मुक्त होण्याची इच्छा असल्यास त्या सर्व सत्तेशाचें भजन केलें पाहिजे; केवळ ब्रह्मोपासना करून चालवयाचें नाहीं.

रज्ज्वामहेर्यथाऽभानं भानवा जायते नृणाम् ।
मायया मायिनो लोके, नतु रज्जोस्तथात्मनः । ८४ ।

या मायामय जगतीतलावर नेहमी असें घडतें कीं, एखादी छांव पडलेली दोरी पाहून लोकभयचकीत होतात; व मोठ्यानें " जगी साप, जंगी साप " ह्मणून आरोळी ठोकतात. किंवा उलटपक्षीं " अहो तो साप कसचा, दोरी आहे दोरी " असें ही ह्मणतात. परंतु तीच दोरी जवळ अगदीं स्वच्छ ठिकाणी पडलेली असल्यास या दोहांपैकीं कोणताही प्रकार घडत नाहीं. दृष्टांतांत दोरी ही अधिष्ठानभूत आहे. आत्मज्ञानाचाही मासला याच प्रकारचा आहे. प्रथमतःजग सत्यवत् भासत असून ब्रह्म खोटें आहे असें वाटत असतें व मागून जगच असत् आहे ब्रह्ममात्र खरें होय असें ह्मणण्यास आपणच तयार होत असतों. खरें पाहतां ब्रह्म रज्जुवत् निर्वीकार असें आहे; परंतु तेंच कालत्रयाबाधित ब्रह्म आपल्या शक्तीच्या योगेंकरून सर्व जगाची घटना करीत असतें.

आतां परमात्मा जग निर्माण करून त्यावर अविद्येचें आवरण कां घालतो ह्मणाल तर त्या वांचून जगह्रीला दाखविण्याचा त्याचा हेतु सिद्धिस जावयाचा नाहीं. अनेक अद्भुत चमत्कार दाखविणारा गारोडी असेंच करीत असतो. प्रथम तो मंत्रसिद्धि मिळविली आहे असें दाखवून नंतर दोरीचा सर्प करणें, पैशापासून रुपये तयार करणें वगैरे हस्तकौशल्याचे प्रकार लोकाना दाखवितो. ते सर्व जरी खोटे असतात तरी लोकांस तसें वाटत नाहीं. परमेश्वरची माया तरी या प्रकारचीच आहे.

भोक्तृभोग्यादिकंविश्वं सृष्टमीशेनमायया ।
तदाज्ञया स्वधर्मेण ये तं नाराधयन्ति तान् ॥ ८५ ॥
कर्मपाशैर्निबध्नाति निजाज्ञोल्लङ्घिनः प्रभुः ।
येतुतं शरणं याता मुक्तिभाजस्त एव हि ॥ ८६ ॥

हें पंचभौतिक, लिंगस्थूल शरीरादि सर्व चिज्जडात्मक विश्व परमेश्वरानें आपल्या त्रिगुणात्मक मायेच्या योगें-करून निर्माण केलेलें आहे. यावर त्यानें अनेक प्राणी उत्पन्न केलेले आहेत पण त्या सर्वांमध्यें उत्तम असा जो मानव देह त्याचेठायींच प्रथमतः त्यानें जीवरूपानें प्रवेश केला. असो. पण मानवदेहाविषयीं प्रथम परमात्म्यानें इतकी आदरबुद्धि दाखवून सरतेशेवटीं त्यास एवढालीं जबरदस्त संसारबंधनं लाविलीं याचें कारण काय असावें ? मनुष्यांना जन्मास आल्या दिवसापासून तों मृत्यू येईपर्यंत किती तरी प्रकारचीं दुःखें भोगावीं लागतात! खरें आहे. परंतु याचा दोष ईश्वराकडे नसून तो आपल्या स्वेच्छाचरणाकडेच आहे. सुखदुःख जें भोगावें लागतें तें केवळ आपापल्या पूर्वकर्मानुरोधानें आपणास प्राप्त झालेलें असतें. ह्मणून कर्माचरण चोख असावें. " अहरहःसंध्यामुपासीत् " वगैरे प्रकारचे जे धर्म लावून दिलेले आहेत, ते नीट रीतीनें पाळिले पाहिजेत. आपापल्या धर्म समजुतीप्रमाणें ईश्वराराधना केली पाहिजे. असें जर होईल तरच सर्व ठीक आहे.

" आतां अविहिताचरण जर मनुष्यमात्रांना संसार-बद्ध करण्यास कारण होतें तर मग विहिताचरणापासूनही कांहीं तरी कर्मबंधनें त्यांचे मागें लागलीं पाहिजेत. कारण

कर्म हें अविनाशी आहे. त्याचा परिणाम मागें राहिलाच पाहिजे." शंका अगदीं बरोबर व तिचें समाधानही पण प्रत्यक्ष भगवंतांनींच केलें आहे:—

' यथार्थात्कर्मणोन्यत्र लोकोऽयं कर्मबंधनः ॥
तदर्थं कर्म कौन्तेय मुक्तसंगः समाचर ॥ १ ॥"

यज्ञः परमेश्वराः । ईश्वराराधने खेरीज करून दुसऱ्या अन्य हेतूंनी केलेलीं कर्में मनुष्यमात्रांस बंधनास कारण होतात—ईश्वराराधनार्थ केलेलें कर्माचरण बंधक होतें—असें नाहीं.

ईश्वराराधना करून तत्प्रसाद मिळविला तर सर्व ठीक आहे. परंतु जर कां आपल्या कर्माचा रोंख तद्व्यतिरिक्त अन्य मार्गाकडेच असला तर फार दुस्तर प्रायश्चित्त भोगावें लागतें. ईश्वरी नियम सोडून केलेलीं कर्मे आपणांस दुर्वासनारूप पाशामध्यें जखडून टाकितात आणि ह्मणून मग कर्माप्रमाणें चांगल्या वाईट अशा नानायोनीमधून अनंतकालपावेतों भटकत रहावें लागतें अशा प्रकारची मनुष्यमात्रांची स्थिती अगदीं ईश्वराधीन आहे कोणतेंही कार्य तो स्वतंत्रपणें करण्यास समर्थ नाहीं. असें असतांना उगाच, " अमुक गोष्ट मी केली " असा छातीस हात लावून पोकळ अहंपणा भोगणें किती तरी मूर्खपणाचें काम आहे? असल्या लोकांचा ईश्वरास अर्थातच फार तिट्कारा असतो. पहाः—

" आत्मसंभाविताः स्तब्धा धनमानमदान्विताः ।
यजन्ते नामयज्ञैस्ते दम्भेनाविधिपूर्वकम् ॥ १ ॥
" अहंकारं बलं दर्पं कामं क्रोधं च संश्रितः ।

मामात्मपरदेहेषु प्रद्विषन्तोऽभ्यसूयकाः ॥ २ ॥
" तानहं द्विषतः क्रूरान्संसारेषु नराधमान् ।
क्षिपाम्यजस्रमशुभानासुरीष्वेवयोनिषु ॥ ३ ॥
" आसुरीं योनिमापन्ना मूढा जन्मनि जन्मनि ।
मामप्राप्यैव कौन्तेय ततोयान्त्यधमागतिम् ॥ ४ ॥

आपल्या ठिकाणीं आपणच मोठेपणा मानून असाधारण गर्वानें फुगून जाणाऱ्या ढोंग्यांना व्याघ्रादि तामसयोनीं-मध्यें पुनः पुनः पिरट्या घालून अखेरीस परम कष्टप्रद व अमंगल अशा असुर योनीमध्यें वास करावा लागतो. तामस योनीमधून यत्किंचित् तरी देहाची स्वस्थता असते पण पुढें काय आहे? तेथील एक एक घोर यातना सांगतां पुरवत नाहींत. असो. तर मग ईश्वराच्या आज्ञेबर-हुकूम जे भाग्यशाली आपलें आचरण ठेवितात त्यानांच काय तें परम सुखप्रद असें कैवल्यपद प्राप्त होतें. ठीकच आहे पित्राज्ञेचें उल्लंघन करणाऱ्या स्वैराचरणीं मुलास आपली सर्व धनदौलत देण्यास पित्यास योग्य वाटेल काय? कधींही वाटणार नाहीं. मग त्या सर्व नियंत्याची उपेक्षा करून कसें चालेल?

शास्त्रा ऽभिज्ञोप्यसत्पुत्रःपितृभक्ति पराङ्मुखः ।
पित्रा त्युपेक्षितस्यास्य पैतृकं दुर्लभं धनम् ॥ ८७ ॥
तथा वेदान्तसिधान्तपारगःशमवानपि ।
हरेर्भक्तिविहीनो यस्तस्य मुक्तिःसुदुर्लभा ॥ ८८ ॥

पुत्र सर्व शास्त्र पारंगत आहे, च्यारचौघे त्याला उत्तमप्रकारचा मान देत आहेत पण त्याचे ठायीं जर

पितृभ.ीचा लेशाही नाहीं तर मग त्याच्या त्या शास्त्रनैपुण्याचें त्या पित्यास काय करावयानें आहे? मी शास्त्रज्ञ या अभिमानानें जर तो पित्याशीं उद्धट रीतीनें वर्तन करून त्याचें अभिष्ट करीत नसेल तर पिताही अर्थात त्याची उपेक्षाच करणार. आपण कमाविलेली संपत्ति, जमीन जुमला, त्यास कधींही देणार नाहीं. सदर्हूप्रमाणेंच कोणी वेदांत सिद्धांतामध्यें वगैरे अगदीं परम निपूण आहे पण त्याची त्या जगज्जनकाचे ठिकाणीं भक्ति मात्र मुळींच नाहीं तर त्यास ईश्वरानुग्रह होऊन कैवल्यपद कालत्रयींही प्राप्त होणार नाही. ईश्वरानुग्रहा-या भक्कम पायावर जर सर्व इमारत उभारलेली असेल तरच कांहीं फायदा होईल. नाही तर वाळूंतील पायाप्रमाणें सर्वच केंव्हां ढांसळेल याचा नेम नाहीं. श्रीमद्भागवतांत ह्मटलें आहे:—

" येन्ये रविन्दाक्षविमुक्तमानिन स्त्वय्यस्तभावाद्-
विशुद्ध बुद्धयः । आरुह्य कृच्छ्रेण परं पदं ततः प-
तन्त्यधो नादृत युष्मदङ्घ्रयः ।। १ ।।"

ईश्वराचे ठायीं ज्यांची भावना नाहीं अशा लोकांना जरी यदाकदाचित पूर्वजन्मींच्या सुकृताच्या योगें करून मोक्षप्राप्ति होण्याचा संभव असला तरी तो सर्व नाहींसा होऊन ते अधःपतन पावतात.

पितृभक्तो विमूढोऽपि पैतृकं लभते धनम् ।
तथाचार विहीनोऽपि कृष्णभक्तोऽखिलं लभेत । ८९ ।
तस्मात्सर्वात्मना सेव्यो नरैर्नारायणः सदा ।
तस्य भक्तिविना मुक्तिर्नास्त्युपाय शतैरपि ।। ९० ।।

एखादा मुलगा शास्त्राध्ययन रहित असूनही जर तो आपल्या पित्याची सेवाचाकरी करून, त्याच्या आज्ञेचें उल्लंघन न करितां शुश्रुषापरायण राहून त्याची मर्जी सुप्रसन्न ठेवीत असेल तर त्यास आपल्या बापाची सर्व धनदौलत सहजपणें मिळूं शकते. त्याचप्रमाणें कैवल्यपति जो **श्रीकृष्ण**परमात्मा त्याची श्रवणकीर्तनादि योगेंकरून जो एकनिष्ठभावें भक्ति करितो मग तो श्रौतस्मार्तादि धर्माचरणविहीन कां असेना-त्यास त्याच्या अखिल मन कामना पूर्ण करून सायुज्यतेप्रत पोंचविण्यांत तो दुर्लक्ष करीत नाहीं. कैवल्यपदाप्रत गेल्यावर त्यांना निर्गुणोपासकांप्रमाणें अधःपतनाची भीती मुळीच नाहीं. सारांश शमदमादि साधनमात्रें करून आत्मानात्म विचार करणाऱ्या ज्ञानिलोकांपेक्षांही योग्यता रहित मूढ जनांना केवळ त्यांच्या अनन्य भक्तीपासून प्राप्त होणाऱ्या भगवत्प्रसादाच्या योगानें मोक्षाचा मार्ग अधिक सुलभ असा होतो. शिवाय-'**अपिचेत्सु दुराचारो भजते मामनन्यभाक्**' इत्यादिभगवदुक्तीवरून त्यांचेठायीं ईश्वराचें किती अकृत्रिम प्रेम असतें हेंही उघड होतें. तुन्हां पुरुषार्थचतुष्टय प्राप्तीस्तव ज्या साधनांची जरूर असते त्याचेंही येथें प्रयोजन नाहीं.

ह्मणून ईश्वराराधना करण्यास योग्य अशीं सर्व साधनें ज्यांना उपलब्ध आहेत त्या मनुष्यमात्रांनीं एक भावेंकरून नारायणाची पूजार्चनादि विधिपूर्वक सेवा केली पाहिजे. नार ह्मणजे जीवसमूह व आयन ह्मणजे आश्रय तर जीव समूहाचा आश्रय जो नारायण तोच एकदां प्रसन्न करून घेतला ह्मणजे मग आपणांस कसली

हिंजे तेथें-फुकट-प्रयत्न केल्या शिवायच मिळणारें आहे, आणि तेंच ज्यानें मला निस्सीम भक्तीनें अर्पण केलें त्यानें माझ्यासाठीं वैकुंठापेक्षांही मोठमोठालीं देवालयें बांधिल्या-प्रमाणें व कौस्तूभरत्नांहूनही सतेज अलंकार अर्पण केल्याप्रमाणें होतें."

एवं समर्पणेनैव निर्मलं जायते मनः ।
ततः पुंसां हरौप्रेम भक्तिबीजमवाप्यते ॥९२॥
ततोलीलाकृतेर्भूम्नो हरेरद्भुतकर्मणः ।
गुणानां श्रुतिमात्रेण प्रवतां याति मानसम्।९३

अशा प्रकारें सहज प्राप्त होणारीं जीं फलपुष्पपत्रें यांच्या अर्पणें करून अनेक जन्मकृत धर्माधर्मजनित वासनांनी कलुषित झालेलें जें मन तें अगदीं निर्मल होऊन जातें. प्राणायामादि साधनांची येथें जरूरी मुळींच नाहीं. अशा रीतीनें मन स्वच्छ झालें ह्मणजे श्रद्धावान् पुरुषाचे-ठायी ईश्वराविषयीं निर्मल प्रेम उत्पन्न होतें, व हेंच प्रेम आमच्या भक्तिकल्पलतेचें बीज होय. निजानंद परिपूर्ण भगवान् हा भक्तप्रेमाचा फार भूकेलेला असतो. भक्तिभावानें अर्पण केलेल्या एका तुलसीदलानें भगवान जितके संतुष्ट होतात तितके रत्नादि अमोल देणग्यांनीही होत नाहींत. श्रीकृष्णचरित्रामध्यें याची साक्ष जागोजाग दिसून येते. कौरव पांडवांमध्यें जेव्हां भयकर कलह माजून युद्ध सुरूं होण्याची वेळ आली त्या वेळीं श्रीकृष्णपरमात्मा उभयपक्षांमध्यें समेट करण्याचे उद्देशानें कौरवनगरीमध्यें गेले असतांना, प्रभुंचेठायीं भक्तिविहिन जो राजा दुर्योधन त्यानें त्यांना भोजन करण्या विषयीं फार आग्रह

केला परंतु भगवंतांनीं तें मुळींच न ऐकतां जें उत्तर केलें आहे तें फार लक्ष देण्याजोगें आहे. ते ह्मणाले:—

" द्विषदन्नं न भोक्तव्यं द्विषन्तं नैव भोजयेत् ।
पाण्डवान् द्विषसे राजन्मम प्राणाहि पाण्डवाः ॥१॥"

परंतु तेंच भक्तश्रेष्ठ जो विदूर यांनीं बोलाविलें नसतांहीं त्याचे घरीं स्वतः होऊन गेले, आणि तेथें परमात्म्याचे दर्शनानंदानें वेडावून गेलेल्या विदूर भार्येनें केळीं स्वतः खाऊन त्यांच्या साली ज्या श्रीकृष्णपरमात्म्यांना दिल्या त्याच किंहो त्यांनी खाल्या!!! त्याचप्रमाणें अद्वैतारण्यांत द्रौपदीपाशीं जेव्हां कांहीं खावयास देण्यास नव्हतें तेव्हां थालीस चिकटून राहिलेल्या मेथीचे पानावर भगवंतांनीं आपली भूक भागविली, हें तर जगप्रसिद्धच आहे. अशा एक कां दोन गोष्टी सांगाव्या! श्रीरामावतारांत भिल्लिणीचीं प्रत्यक्ष उष्टीं बोरेंही परमात्म्यास अमृततुल्य वाटलीं.

असो. एकदा परमेश्वरचरणीं असें प्रेम जडलें ह्मणजे, त्यानें आपल्या भक्त संकट-निरसनार्थ घेतलेल्या अनेक अवतारांत केलेल्या अद्भुत लीलांचे गुणानुवाद ऐकावेसें वाटूं लागतें. गृहदारपुत्रादि विषयांपासून जनांचें चित्त हरण करून घेणारा जो हरि त्याच्या नानाविध लीलाचें यथातथा वर्णन करण्यास कोण समर्थ होणार नाहीं? सीताशुद्धयर्थ केलेलें सेतुबंधन, गो-गोपीगोपाल रक्षणार्थ केलेलें गोवर्धनोद्धारण, किंवा द्रौपदीस लज्जायमान् करण्याचे हेतूनें कौरव सभेंत दुष्टांनीं तिचें वस्त्र हरण करण्याचा यत्न केला असतां परमेश्वरानें केलेलें वस्त्रपूरण, वगैरे भक्तवात्सल्यदर्शक प्रेमळ कथांचे श्रवणमात्रें करून चित्त

अगदीं द्र्व न जातें; व हें असें भगवद्गुणश्रवणामृतवृष्टीनें स्निग्ध झालेलें मन भक्तिबीजारोपणास परम योग्य असें होतें.

**तस्मिन्स्निग्धालवालेच प्रेमबीजात्सुकोमलाः ।**
**रत्यंकुरो भवत्यस्य जीवनं सत्कथामृतम् ॥ ९४ ॥**
**श्रवणार्थैर्हरेरात्म व्यासान्तैर्नवपल्लवैः ।**
**वर्द्धितात्साधुसंगेन भक्तिकल्पलतानिशम् ॥ ९५ ॥**

वर सांगितलेल्या भगवद्गुणश्रवणानें स्निग्ध झाल्यामुळें भक्तिबीजाची लागवड करण्यास योग्य अशा मनोभूभागरूपी आळ्यामध्यें त्या प्रेमबीजापासून सुकोमळ इच्छारूप असा भक्तिकल्पलतेचा अंकुर निर्माण होतो. या रत्यंकुराचें जीवन ह्मटलें ह्मणजे—भगवंताच्या नानाविध प्रेमळ कथारूप अमृत हेंच होय. आणि हें अमृत संतसज्जनांच्या समागमापासून उत्पन्न होणारें असतें. सज्जनांच्या समागमामध्यें असतांना; प्रभूंनी श्रीनृसिंह रामकृष्णादि अनेक अवतारांतून हिरण्यकशिपु रावण, कंसादि, दुष्टांचें निर्दाळन करून प्रल्हाद, बिभीषण व यादवादि आपल्या अनेक शरणागत भक्तांचें परिपालन कसें केलें वगैरे चित्तवृत्ति अगदी तदाकार करून टाकणाऱ्या या भक्तिरसपरिप्लुत कथा वारंवार निवावयाच्याच व या कथामृताच्या सेवनेंकरून भगवंताचे ठिकाणीं श्रद्धा उत्पन्न होऊन आस्तिक्यबुद्धि वृद्धिंगत होते. ह्मणजे प्रथमतः फक्त पत्रपुष्पादि अनायासें करून प्राप्त होणाऱ्या वस्तु भगवंतास भक्तिभावानें अर्पण केल्या असतां चित्त शुद्ध होऊन त्याचे ठिकाणीं प्रेमबीजाची उत्पत्ति होते, आणि पुढें भगवद्यशश्रवणानें अंतःकरण आर्द्र होत्सातें त्या प्रेम बीजाचे लागवडीस अगदीं

उत्तमप्रकारची अशी मनोभूमिका तयार होते. अशाप्रकारें या भक्तिरसाच्या उत्तरोत्तर होणाऱ्या रूपान्तराच्या एकादश भूमिका केलेल्या आहेत. त्या येणेंप्रमाणें:–

१ प्रथमं महतां सेवा, २ तद्दयापात्रता ततः
३ श्रद्धाऽथतेषांधर्मेषु. ४ ततो हरिगुण श्रुतिः
५ ततो रत्यंकुरोत्पत्तिः ६ स्वरूपाधिगतिस्ततः
७ प्रेमवृद्धिः परानंदे. ८ तस्याश्च स्फुरणं ततः
९ भगवद्धर्मे निष्ठातः १० स्वस्मिंस्तद्गुणशालिता
११ प्रेम्णोऽथ परमाकष्टे. १२ इत्युक्ता भक्तिभूमिकाः

भक्तीचेही श्रवणादि करून नऊ प्रकार आहेत. ते आमच्या भक्तिकल्पलतेचे नव पल्लव होत. या नऊही पल्लवांची उत्तम प्रकारची जर जोपासना ठेविली तर कल्पलतेस जो कांही जोम येतो तो सांगतां पुरवत नाहीं. धन्य आहे त्या साधु लोकांची! एक तेच या लतेस सदा ताजी टवटवीत ठेऊं जाणतात! एकादशस्कंधांत भगवंतांनीं साधु लक्षण सांगितलें आहे:–

"कृपालुरकृतद्रोहस्तितिक्षुः सर्व देहिनाम् ।
सत्यसारो न बाह्यात्मा समः सर्वोपकारकः ॥ १ ॥
कामैरहतधीर्दान्तो मृदुः शुचिर किञ्चनः ।"
अनीहोऽमित भुक् शान्तः स्थिरोमच्छरणो मुनिः॥२॥
अप्रमत्तो गभीरात्मा धृतिमान् जितषड्गुणः ।
अमानीमानदः कल्पो मैत्रः कारुणिकः कविः ॥ ३ ॥
आज्ञायैवं गुणान्दोषान्मयादिष्टानपिस्वकान् ।
धर्मान संत्यज्य यः सर्वान् मां भजेत स उत्तमः ४ ॥"

अशा प्रकारें भगवंतांनीं सांगितलेले धर्म जो पाळीत नाहीं पण आपले गुण दोष देखील त्याचेच ठायीं अर्पण करतो तो साधु उत्तम. असल्या प्रकारच्या साधु लोकांच्या सहवासानें प्रभूच्या अनेक लीलांचीं वर्णनें कानीं पडून नवविधा भक्तिचें रहस्य चांगले प्रकारें कळ- ल्यांत येतें. या नऊ प्रकारांतून फक्त एका प्रकाराचें जरी अवलंबन केलें तरी पुरे आहे; मग सर्वांगेंकरून जे त्याची भक्ति करितात त्यांचें माहात्म्य कोणीं व किती वर्णावें! श्रीशुकाचार्यांनीं भागवतामध्यें भगवत्कीर्तनादि भक्तीचें माहात्म्य वर्णन केलें आहे—

"यत्कीर्तनं यच्छ्रवणं यदर्चनं यद्वन्दनं
यत्स्मरणं यदीक्षणम् । लोकस्य सद्यो विधु-
नोति कल्मषं तस्मै सुभद्रश्रवसेनमोनमः" ॥ १ ॥

या नवविध भक्तिमार्गापैकीं एकेकाच्याच आश्रयानें कोण कोण भक्तशिरोमणी उद्धरून कैवल्यपदाप्रत जाते झाले त्याचें वर्णन मागें आलेंच आहे. असो. ही **भक्ति-कल्पलता** या नवविध भक्तिरूप पल्लवांनी एकदां खासी चिगरली ह्मणजे तीस बहार येऊन उत्तम प्रकारचीं पुष्पें यावयास आरंभ होतो.

श्रीकृष्ण राम गोविंद माधवाच्युत केशव ।
इत्यादि भगवन्नाम घोष पुष्पा विराजते ॥ ९६ ॥
सर्वस्वार्पणतोविष्णौ तस्यानुग्रह तोऽचिरात् ।
तन्निष्ठ चित्तसां तच्य ध्यान पक्का दृढायते ॥ ९७ ॥

भग, ह्मणजे ऐश्वर्य, धर्म, यश, संपत्ति, वैराग्य व मोक्ष

असा षड्गुणैश्वर्यवान जो श्रीकृष्णपरमात्मा त्याच्या एकेका नामाचा महिमा फार अगाध आहे. हे परब्रह्मस्वरूपा कृष्णा! योगीलोक ज्याचेठायीं रममाण होतात अशा सच्चिद्घना रामा! सर्वेंद्रिय अधिष्ठात्या सर्वज्ञा गोविंदा! मा ह्मणजे लक्ष्मी किंवा मोक्ष श्री–ब्रह्मविद्या यांचेवर ज्याचें पूर्णाधिपत्य आहे अशा माधवा! जगदुत्पत्ति स्थितिलयादि सर्व कर्तृत्व स्वतःचे हातीं ठेऊनही आपण मात्र स्वरूपस्थितीं पासून कालत्रयींही न ढळणाऱ्या अच्युता! अशाप्रकारें करुणोत्पादक हरिनामाचा घोष केला असतां आपल्या भक्तिकल्पलतेला सुवासिक पुष्पांचे घोंस यावयास कितीसा उशीर लागणार आहे? हरिनाम गानाचा महिमाच असा आहेः—

"श्रुतिकोटि समंजाप्यं जपकोटि समंहविः।
हविःकोटि समं गेयं गेयं गेय समं विदुः॥ १॥"

स्कंद पुराण.

"नव्यं नव्यं नामधेयं मुरारेर्यद्यत्पेयतद्धेयपीयूष पुष्टम्।
येगायन्तित्यक्तलज्जाः सहर्षंजीवन्मुक्ताः संशयो नास्ति तत्र॥ २॥" ना. पु.

जपजाप्या पासून श्रुतिकोटीचें पुण्य आहे, व एक यज्ञानें जपकोटीचें श्रेय मिळतें. परंतु हेच यज्ञ जेव्हां कोटी करावेत तेव्हां हरिस्तुति गीताची बरोबरी होऊं शकते. आणि त्या गीताची बरोबरी तर कशानेंही होणार नाहीं! नारसिंह पुराणांत प्ऱ्हाद हिरण्यकशिपुप्रत सांगतो,—

" किंतात वेदागमशास्त्रचिन्तनै स्तीर्थैरनेकैर्विधिवद्विगाहितैः । किं दान होमै र्जपकोटि यज्ञै गोविन्द गोविन्द इति स्फुटं रट ।। १ ।।

पूर्ण भक्तिभावानें " गोविंद गोविंद " असें नामसंकीर्तन केलें ह्मणजे मग त्यापुढें वेदशास्त्रनैपुण्य, तीर्थस्नानें, जपजाप्य किंवा यज्ञयाग यांचा कांहींच पाड नाहीं.

गृहदार पुत्र त्याचप्रमाणें अहंकारादि सर्व मनोविकार किंवा ' माझें " ही संज्ञा ज्यास असेल तें सर्व प्रभूचे ठायीं अर्पण केलें असतां ईश्वरानुग्रह तात्काळ होऊन चित्त परमात्मनिष्ट असें बनतें. ह्मणजे अर्थात तें ध्यान करण्यास योग्य होत्सातें संप्रज्ञात समाधि साध्य होऊन भक्तिकल्पलतेचीं पाळें-मुळें दृढ होतात. पूर्वीपासून केलेलीं सर्व कर्में ही भगवत्चरणीं अर्पण केलीं ह्मणजे चित्त शुद्ध होतें. कर्तृत्व भोक्तृत्वाविषयींचा सर्व अभिमान सोडून सर्व व्यापार तत्परायण झाला पाहिजे त्या अंबरीषराजाची महती काय वर्णावी ?

" वासुदेवे भगवति तद्भक्तेषुच साधुषु ।
प्राप्तोभावं परं विश्वं येनेदंलोष्टुवत्स्मृतम् ।। १ ।।
" सवैमनःकृष्णपदारविन्दयोर्वचांसिवैकुण्ठगुणानुवर्णने । करौहरेर्मन्दिरमार्जनादिषुश्रुतिचकाराच्युतसत्कथोदये ।। २ ।।
मुकुन्दलिङ्गालयदर्शनेदृशौतद्भृत्यगात्रस्पर्शेऽङ्गसंगमम । घ्राणंचतत्पादसरोजसौरभे श्रीमत्तुलस्यारसनार्पिते रसे ।। ३ ।।

" पादौहरेः क्षेत्रपदानुसर्पणे, शिरोहृषीकेशपदाभिवंदने। कामंच दास्ये न तुकामकाम्ययायथोत्तम श्लोकजनाश्रयारतिः ॥ ४ ॥

" एवंसदाकर्मकलापमात्मनः परेऽधियज्ञे भगवत्यधोक्षजे। सर्वात्मभावं विदधन्महीमिमांतन्निष्ठ विप्राभिहितःशशासह ॥ ५ ॥

सप्तद्वीपा जी वसुंधरा तिच्यावर पूर्ण आधिपत्य असून ही त्यास (अंबरीषास) ऐहिक वस्तूंची किंवा सुखाची मुळींच फिकीर नव्हती. हस्तपादादि सर्व त्याचीं इंद्रियें अविकल ह्मणजे धट्टीं कट्टीं असून त्यांना भगवत्सेवेशिवाय दुसरा व्यापारच उरला नव्हता. त्याचीं प्रत्येकांचीं कामें वर सांगितलेलींच आहेत.

ततोऽजसा प्रसूतेऽसौ स्वानंद फलमव्ययम्।
तदोत्तमस्यभक्तस्यप्रेमोत्कर्षोऽभिजायते ॥ ९८ ॥

सर्वस्वार्पणानें चित्तशुद्धी होऊन पुत्रदारादि ऐहिक पाश नष्ट होत्साते आत्मज्ञानानें भक्ति पक्वदशेप्रत पोंहचून हरिचरणीं दृढ होते ह्मणून वर सांगितलेंच आहे. येथ पर्यंत चित्तालवालामध्यें भगवत्प्रेम बीजाची लागवड होऊन त्यास नवपल्लव पुष्पगुच्छ कसे येतात, याचा विचार झाला. आतां त्या भक्तिकल्पलतेस येणारीं फलें पहावयाचीं.

शांतपणानें भगवंताचें ध्यान अगदीं उत्तम प्रकारचें असें व्हावयास लागलें ह्मणजे लवकरच आपल्या कल्पलतेला स्वस्वरूपानंदरूप अव्यय, अनीश्वर व सर्वकाल ताजीं टवटवीत रहाणारीं अशीं सुंदर फलें यावयास लागतात.

आतां गुरुपदेशावरून शमदमादिसाधनांच्या साह्यानें मन अगदीं निर्मलकरून महत्प्रयासानें उपलब्ध होणारें स्वरूपदर्शन, केवळ भगवच्चिंतनानें कसें प्राप्त होतें, अशी शंका जर कोणास येत असेल तर ती अगदीं निरर्थक आहे. भागवतांत भगवान् पिप्पलायनानींच या शंकेचें समाधान उत्तम प्रकारें केलें आहे. ते ह्मणतातः—

" यर्ह्यब्जनाभ चरणैषणयोरुभक्त्याचेतो मलानि
विधमेद्गुण कर्मजानी । तस्मिन्विशुद्धउपलभ्यत
आत्मतत्वं साक्षाद्यथामलदृश सवितृ प्रकाशः । १ ।

त्याचप्रमाणें भगवतांनी ह्मटलें आहेः—

" प्रोक्तेन भक्तियोगेन भजतोमांऽसकृन्मुने ॥
कामा हृदय्यान्नश्यंति सर्वे मयि हृदि स्थिते ॥ १ ॥
" भिद्यतेहृदयग्रन्थीश्छिद्यन्ते सर्व संशयाः
क्षीयन्तेचास्यकर्माणि मयि दृष्टेऽखिलात्मनी ॥ २ ॥
" तस्माद्भक्तियुक्तस्य योगिनो वै मदात्मनाः ॥
न ज्ञानं नच वैराग्यं प्रायःश्रेयोभवेदिह ॥ ३ ॥ "
" यत्कर्म भिर्यतपसा ज्ञान वैराग्य तश्चयत् ॥
योगेनदानधर्मेण श्रेयोभिरितऽरैपि ॥ ४ ॥ "
" सर्वं भक्तियोगेन मद्भक्तो लभतेञ्जसा ॥
स्वर्गापवर्ग मद्धाम कथं चिद्यदि वाञ्छति ॥ ५ ॥
" न किञ्चत्साधवोधीरा भक्ताह्य कान्तिनो मम ।
वाञ्छन्त्यपिमयादत्तं कैवल्यमपुनर्भवम ॥ ६ ॥

हृदयस्थ सर्व मनोवासनांचा भक्तीच्या योगानें समूळ नाश होतो.

त्याचप्रमाणें ईश्वर साक्षात्कार झाल्यामुळें मनांतील सर्व प्रकारच्या संशयांचा नाश होऊन हातून घडणाऱ्या कर्मांचा कोणत्याही प्रकारें परिणाम होणें बंद होतें. अशा प्रकारें भक्तीस ज्ञानाची किंवा वैराग्याची मुळींच गरज नाहीं. कर्माचरण, तप, वैराग्य, ज्ञान, योग, किंवा धर्माचरण यांच्या विधिपूर्वक आचरणापासून, देवलोक, पितृलोक, अपुनाशन, अष्टविधऐश्वर्य वगैरे जी जीं ह्मणून अनेक फलें प्राप्त होणारीं आहेत, तीं सर्व अनायासें भक्ती पासून प्राप्त होतात. फार तर काय! स्वर्ग, मोक्ष, किंवा वैकुंठ या तिहींतून चाहेल तें भगवद्भक्तांना अगदीं सुसाध्य असतें. परंतु वस्तुतः ज्यांचा सर्व भाव भगवच्चरणीं जडला आहे अशा भक्तशिरोमणींना त्यापैकीं कशाचीही गरज नसते. केवळ परमात्मस्वरूप प्राप्तींतच त्यांचें पूर्ण समाधान होऊन ते प्रेमातिशयांत खुशाल मजेनें डुलत राहतात. त्यांचें सर्वांग रोमांचानीं भरून नेत्रांतून आनंदाश्रूंचे प्रवाह लोटतात; आणि कंठ दाटून येतो. अशा पूर्ण भक्तियुक्त प्रेमळ भगवंताच्या पादरजांनीं ते जेथें जेथें जातात तीं सर्व स्थलें, फार तर काय, पुण्यक्षेत्रें व तीर्थोदकेंही पावन होतात. तस्मात् भक्तिसाधनासारखा परमेश्वर प्राप्तीस दुसरा उपायच नाहीं. भगवतानींच ह्मटलें आहे:—

" भक्त्याहमेकया ग्राह्यःश्रद्धयात्मा प्रियः सताम्-
भक्तिः पुनातिमन्निष्ठाश्वपाकानपि संभवात् ॥ "

या संसारार्णवांतून मुक्त करण्यास एक परमेश्वरभक्तीच समर्थ आहे, अशा दृढ समजुतीनें श्रद्धापूर्वक जर भगव-

द्भक्ति केली तर ईश्वर प्राप्ति होण्यास बिलकूल वेळ लागणार नाहीं. मात्र आपली भक्ति अनन्यभावानें अशी केलेली असली पाहिजे की, गर्भांतील गोळा ज्याप्रमाणें कोणताही उद्योग जाणत नाहीं त्याचप्रकारची आपली स्थिती झाली पाहिजे अशा अनन्यगतिक चित्तानें जे परमेश्वराची उपासना करतात, ते मग अगदीं उच्च जातींचे असोत किंवा कनिष्ठ जातीचे असोत ते सर्व त्यास सारखेच प्रिय होतात. ह्मणून शहाण्या लोकांनीं भक्तीचा आश्रय जरूर करावा. आतां **ब्रह्म** कशास ह्मणावें, ज्ञान ह्मणजे काय, मनोनिग्रह कसा करावा, वगैरे जीं ब्रह्मप्राप्तीचीं मुख्य साधनें तीं मुळींही अवगत नसतां केवळ भक्तीचेच योगानें ईशप्राप्ति होते असें ह्मणणें बऱ्याच अहंमान्य लोकांना खरें वाटणार नाहीं; परंतु या त्यांच्या शंकांचें समाधान मागें वेळोवेळीं केलेंच आहे. भगवंतांनीं ह्मटलें आहे:--

**" यथाग्निना हेममलंजहाति ध्यातं पुनः स्वं भजते च रूपम् । आत्मा च कर्मानुशयं विधूय मद्भक्तियोगेन भजत्यथो माम् ॥ १ ॥ यथायथात्मा परिमृज्यतेऽसौ मत्पुण्यगाथाश्रवणाभिधानैः ॥ तथातथा पश्यति तत्वसूक्ष्मं चक्षुर्यथैवाञ्जनसंप्रयुक्तम् २ "**

अग्नांमध्यें टाकिलेल्या सुवर्णातील हिणकसभाग जळून जाऊन तें जसें निर्मळ व सतेज असें होतें त्याचप्रमाणें भक्तियोगाचे प्रभावेंकरून पूर्वकर्मरूपी आत्म्यावरील मलाचें सर्व विटाळ नाहींसे होऊन तो पुन्हा आपलें निर्मळ असें स्वरूप धारण करितो. पुण्य कथांच्या श्रवणानें तो स्वच्छ होत जातो, ज्याप्रमाणें अंजन घातल्यावर डोळा

अति सूक्ष्म वस्तु अवलोकनार्थ समर्थ होतो त्याप्रमाणेंच, अतिसूक्ष्मही तत्वें कळण्यास तो समर्थ होतो.

## प्रकरण आठवें.

# भक्तस्थिति.

अथस्वानन्द तृप्तात्मा विभुं भजति सर्वतः ।
नैवं वाञ्छति कैवल्यं कुतः स्वर्गसुखादिकम् ॥ ९९ ॥
बहिरन्तश्चभूतेषु सगुणं निर्गुणं हरिम् ।
यः पश्यति निजात्मानं सवै भागवतोत्तमः ॥ १०० ॥

निरुक्त कर्ममिश्र ( ह्मणजे विहित कर्माचरण करणारे ) शुद्ध आणि ज्ञानमिश्र असे जे एकापेक्षां एक अधीक भक्तजन आहेत ते, भगवत्साक्षात्काराचे योगानें स्वानंद तृप्त होतसाते, सर्वांतर्यामी अद्विनीय अशा परमेश्वराची कायावाचा मनेंकरून आराधना करण्यांतच एकप्रकारचें विशेष सुख मानतात. मुखानें भगवद्गुण गाणें, कानांनीं त्याचें कीर्तन ऐकणें, हस्तांनीं हरिमंदिरात झाड लोट करून सडासंमार्जन करणें वगैरे प्रकारच्या व्यवसायांतच त्यांना सर्व आनंद वाटतो मुक्तिसुखाची त्यांना यापुढे कांहींच किंमत वाटेनाशी होते. भगवान ह्मणतातः—

"न पारमेष्ठ्यं न महेंद्रधिष्ण्यं न सार्वभौमंन रसाधिपत्यम् । न योगसिद्धिं न पुनर्भवं वा मय्यर्पितात्मेच्छति मद्विनान्यत् ॥ १ ॥

त्यांनीं आपल्या सर्व प्रकारच्या इच्छा भगवंतासच अर्पण केल्या असल्या मुळें इंद्रपद, सार्वभौमत्व किंवा योगसिद्धिची वगैरे कसलीच त्यांना अपेक्षा नसते. अशा पूर्ण निरपेक्ष भगवद्भक्तांची परमात्म्यानींच स्तुति केली आहे.

" निरपेक्षं मुनिं शान्तं निर्वैरं समदर्शनम् । अनुव्रजाम्यहं नित्यं पूये तं त्वङ्घ्रिरेणुभिः ॥ १ ॥"

" निष्किञ्चिना मय्यनुरक्त चेतसः ।
शान्तो महान्तोऽखिलजीव वत्सलाः ॥
कामैरनालब्धधियोजुषन्ति ।
यन्नैरपेक्ष्यं न विदुः सुखं मम ॥ २ ॥"

निरपेक्षतेपासून भगवच्चरणीं परा ह्मणजे उत्तमप्रकारची अशी भक्ति जडते, कशी ती पहाः—

" नैरपेक्ष्यं परं प्राहुर्निश्रेयसमनल्पकम् ।
तस्मान्निराशिषो भक्तिर्निरपेक्षस्य मे भवेत् ॥ १॥"

निष्काम भक्त जे आहेत त्यांच्या दृष्टींत आंत बाहेर असा भेद मुळींच नसतो. अखिलब्रह्मांडावर असलेल्या जीवादिकांचेठायीं दृश्यमान् होणारें जें योगैश्वर्यात्मक सगुण स्वरूप किंवा स्वातंर्यामीं असणारें निर्गुण, निर्विकार स्वरूप या दोहोंमध्येंही त्यांना भेदभाव मुळींच वाटत नाहीं; ह्मणजे तो, व मी, अशी कल्पनाच त्यांचे ठायीं नसते. इतर जनांचें स्वात्म्याचे ठिकाणीं अतोनात प्रेम दिसून येतें. परंतु यांना सर्वच समसमान झालें असल्या कारणानें ते ईश्वरास फार प्रिय होतात. अभीष्ट फलसिद्ध्यर्थ आपण

ईश्वरावर प्रेम करतो त्यांत आणि या निष्काम भक्तांचे निरपेक्ष प्रेमांत जमीनअस्मानांचें अंतर आहे; कारण त्यांच्या मनाचा ओढा दुसरी तिसरीकडे मुळींच नसतो. सर्व लय एक त्याकडेच लागलेलें असतें. ज्ञानमार्गी जे मुमुक्षु लोक आहेत ते आपल्या इष्ट हेतुसिद्ध्यर्थ ईश्वर भक्ति करितात पण मनोगत हेतु एकदां सिद्ध झाला ह्मणजे मग पूर्ववत् ते ईश्वर भजनाची हेळसांड करितात. ईश्वरी अवतार वगैरे सर्व त्याच्या मायेचाच पसारा आहे असें समजून ते त्या सगुण स्वरूपाची उपेक्षा करितात. भक्त लोकांची गोष्ट तशी नाहीं. त्यांना ज्ञानप्राप्ति झाल्यावरही ते माया विग्रहवान् श्रीकृष्णपरमात्म्यास व सर्वांतर्यामी सच्चिदानंद निर्गुण स्वरूपास सारखेंच गणतात. व ह्मणूनच त्यांना भक्त सर्वोत्तम असें ह्मटलें आहे. दुसऱ्यास कांटा लागला असतांही, त्यांना तो स्वतःसच लागल्याप्रमाणें दुःख होतें. सर्व भूतांवर स्वात्म्याप्रमाणेंच त्यांची प्रीति असते. कारण परमात्म्याचें वास्तव्य तेथेंच आहे अशी त्यांची दृढ समजूत झालेली असते. ज्यांची दृष्टी अशा प्रकारची होऊन कर्तृत्वादि देहेंद्रिय व्यापारांनींही ज्यांना मोह मुळींच पडत नाहीं त्या भागवतोत्तमांची खरोखर धन्यच ह्मटली पाहिजे! स्व—पर असा भाव मुळींच त्यांचे ठायीं कसा तो उरलेला नसतो. श्री भगवानवर्णन करतातः—

**देहेन्द्रियप्राणमनोधियां यो जन्माप्ययक्षुद्भयतर्ष-कृच्छ्रैः । संसार धर्मैरविमुह्यमानःस्मृत्याहरेर्भाग-वतप्रधानः ॥ न यस्य स्वःपर इति वित्तेष्वात्मनि**

वाभिदा। सर्व भूतसमःशान्तःसर्वै भागवतोत्तमः॥"

आतां हे अंतर्बहिः समदृष्टि ठेवणारे भागवतोत्तम श्रीहरीस विशेष प्रिय कसे होतात तें पाहूं.

**इत्यात्मानं हरिं ज्ञात्वा पूर्णकामोऽप्यहर्निशम् ॥**
**भजत्यनन्यभावेन स भक्तःश्रीपतेःप्रियः ॥ १०१ ॥**

जल आणि वीचि ह्मणजे त्यावर येणारी लाट हीं जरी दिसण्यांत एकमेकाहून भिन्न दिसतात तरी वास्तविक तीं जशीं दोन्ही ही एकच होत, त्याचप्रमाणें परमेश्वराच्या मायामय सगुणस्वरूपांत व चिन्मय निर्गुणस्वरूपांत मुळीच भेद नाहीं, हें पूर्णपणें समजून त्या दोहोंची ही जे निष्काम भगवद्भक्त अनन्य भावानें आराधना करतात ते त्या भक्तवत्सलास सर्वाहून परम प्रिय व्हावेत यांत नवल तें काय? कारण अहर्निश ह्मणजे जागृत्यादि सर्व अवस्थांमधूनही त्यांना ईशस्तवना शिवाय दुसरा धंदाच ठाऊक नसतो. अनेक अवताराचेठायीं परमेश्वरांनीं ज्या अनेक लीला केल्या त्यांचीं वर्णनें ते नेहमीं गात असतात किंवा दुसरे कोणी गात असल्यास एकचित्तपणें कानांनीं ऐकतात अथवा श्रीराम, कृष्ण माधव, मुकुंद, मुरारे, गोविंद, गोकुलपते, हरे, परेश, केशव, रमापते, नृसिंह, नारायण, अखिलगुरो, पुरुषोत्तम, अशा प्रकारचा भगवन्नामपठणाचा सारखा घोष त्याच्या तोंडून चाललेला असतो. संस्कार वासनावशात् निद्रिस्थ असतांनाही त्यांना हरि लीलेचींच स्वप्नें पडावयाचीं. एकाकार समाधि लागलेली असली ह्मणजे तर ते परमानंदांतच निमग्न झालेले असतात. सें आहे ह्मणूनच ते भगवंतास परम प्रिय असे होतात;

शिवाय वर्णाश्रमाभिमान किंवा देहाभिमान हा कसा तो त्यांना मुद्दल माहीतच नसतो. आणि हेंच ते परमेश्वरास इतके प्रिय होण्याचें एक कारण आहे. ह्मटलें आहेः—

"न यस्य जन्मकर्माभ्यां न वर्णाश्रमजातिभिः।
सज्जतेऽस्मिन्नहं भावो देहे वै स हरेः प्रियः॥"
समदुःखसुखो धीरः स्वानन्दाप्लुतमानसः।
अहैतुकीं हरेर्भक्तिं करोत्येव स्वभावतः॥ १०२॥

देहाभिमानी पुरुषांना इष्ट हेतु सिद्ध झाला तर पराकाष्टेचा हर्ष उत्पन्न होतो आणि उलटपक्षीं इष्टकार्यांत अपयश आलें असतां अत्यंत दुःख वाटतें. देहाभिमान रहित लोकांची गोष्ट तशी नाहीं. हर्षविषादादि विकारांचा त्यांचेवर लेशमात्रही बरा वाईट परिणाम होत नाहीं. कारण सर्वसाक्षी चैतन्याबरोबर ते पूर्णपणें एकरूप झालेले असतात. सुखदुःखाचा परिणाम अंतःकरणावर मात्र व्हावयाचा. आतां ज्याचें अंतःकरणच चिद्रूप बनून गेलें आहे, त्यांचेवर या विकारांचें काय प्राबल्य चालणार आहे? सुख किंवा दुःख हीं दोन्हींही त्यांना समसमानच वाटणारीं आहेत. आतां, "मन बुद्धीच्या सामर्थ्यानें तादात्म ध्यासांत जर गुंतलेलें आहे तर त्याच्या सर्व शक्ति शाबूत आहेत असें ह्मणावें लागतें; आणि मनाच्या सर्व शक्ती जर अगदीं शाबूत आहेत तर मग सुखदुःखानुभव त्यास होत नाहीं असें ह्मणणें कसें शोभेल" अशी शंका कोणी काढील तर त्यावर उत्तर मागें एक प्रसंगीं आलेलेंच आहे. मनावर सुखदुःखाचा परिणाम होणें हा कांहीं त्याचा स्वभावसिद्ध धर्म नव्हे. आतां तो परिणाम होतो हें

केवळ जीवांच्या भोंवताळच्या परिस्थितीवर व अज्ञानेंकरून त्यांचे हातून घडणाऱ्या कर्माचरणावर अवलंबून आहे.

" भगवत्परिचर्यया-विनष्टायां-त्वविद्यायां स्वा-
नन्दावृतमानसः ॥ १ ॥"

भगवत्सेवेच्या योगेंकरून अज्ञानतिमिराचा एकदां नाश झाला ह्मणजे मन स्वानंदावृत होतें, ह्मणजे त्यास स्वानंद प्रकाशाचा चोहींकडून वेढा बसतो. मग त्यास इष्टानिष्ट कसें समजणार? भागवतांत ह्मटलें आहेः-

" अकिञ्चनस्य दान्तस्यशान्तस्य समचेतसः ।
मयासंतुष्टमनसः सर्वाः सुखमया दिशः ॥ १ ॥"

त्याचप्रमाणें योग वासिष्ठांत ह्मटलें आहेः-

" पूर्णे मनसि संपूर्णं जगत्सर्वं सुधाद्रवैः ।
उपानद्‌गूढ पादस्य ननु चर्मावृतेव भूः ॥ १ ॥"

मन एकदां स्वानंदावृत झालें ह्मणजे विषानें भरलेले पेलेही त्यास अमृतमयच भासतात पायांत भक्कम चर्मी जोडा असल्यावर कांट्यांवरून किंवा निखाऱ्यांवरून चालत गेलें तरी कातड्यावरून चालल्याप्रमाणेंच वाटणार आहे. त्याचप्रमाणें मन निजानंदोपभोगानें अगदीं तृप्त झालें असल्याकारणानें त्यास विषयसुखाची मुळीच पर्वा वाटेनाशी होऊन त्याचेठायीं समदर्शीत्व बाणतें. भगवान् ह्मणतातः-

" बाह्यस्पर्शेष्वसक्तात्मा विन्दत्यात्मनि यत्सुखम् ।
स ब्रह्मयोगयुक्तात्मा सुखमक्षयम श्नुते ॥ १ ॥"

इंद्रियांच्या अनिवार्य इच्छा पूर्ण करणारीं जीं जीं

बाह्य सुखें आहेत त्यांचे ठिकाणीं ज्यांची मुळींच आसक्ति नाहीं अशा निरपेक्ष तृष्णाशून्य पुरुषांना जें स्वात्म्याचे-ठायीं अनुपम्य सुख प्राप्त होतें तें अक्षय्य ( सर्वकाल पावेतों ) टिकणारें असें असतें. कारण त्या पुरुषांचें अंतःकरण ब्रह्मयोग ह्मणजे परमात्मस्वरूपाचेठायीं जी समाधि तिज-मध्यें पूर्णपणें रममाण झालेलें असतें. पुन्हां त्यांची ही एक मजा आहे कीं, त्यांना जरी या अक्षय्य सुखाची प्राप्ति झालेली असते तरी त्यांची भगवच्चरणीं असलेली प्रीति तिलप्रायही कमी होत नाहीं परमेश्वर गुणश्रव-णादिरूप जी त्यांची हरिभक्ति तिजमध्यें कधींही खळ पडत नाहीं. आता ते ह्मणजे असें मुद्दाम करतात असेंही नाहीं; तर पूर्वींपासून चालत आलेला क्रम ते स्वभावतः-च तसा पुढें चालवितात. भागवतांत ह्मटलें आहेः—

**" आत्मारामाश्च मुनयो निर्ग्रन्था अप्युरुक्रमे ।**
**कुर्वन्त्यहैतुकीं भक्ति मित्थम्भूतगणो हरिः ॥ १ ॥"**

निजानंदांत रममाण झालेले मुनिवर्य देखील ज्या अर्थी निरपेक्ष भक्ति आचरतात त्या अर्थीं हा कांहीं तरी त्या हरीचाच विशेष गुण असला पाहिजे.

**" निवृत्ततर्षैरुपगीयमानाद्भवौषधा-च्छ्रोत्रमनोभि-रामात् । क उत्तमश्लोकगुणानुवादात् पुमान्विर-ज्येत विना पशुघ्नात् ॥ १ ॥"**

सारांश. ज्या भगवद्भक्तीचे ठिकाणीं पूर्ण मुमुक्षु अशा ज्ञानसंपन्न लोकांची देखील इतकी विलक्षण आसक्ति दिसून येते तिचा आपण अज्ञ जनांनीं आश्रय न करणें

ह्मणजे आपण होऊनच आपल्या पायावर धोंडा पाडून घेण्यासारखें आहे.

एवं भक्तिर्हरेः प्रायः सुलभा ज्ञायतां बुधैः ।
साधनं सुलभं यस्या नामसंकीर्त्तनादिकम् ॥१०३॥

त्यांतून ही अखिल मनोरथ पूर्ण करणारी भक्तिरूप कामधेनु प्राप्त करून घेण्यास विशेष कष्ट पडत असतील तर एक असो. केवळ पत्रपुष्पें मनोभावानें ईशचरणीं अर्पण केलीं असतां तो भक्तप्रिय पूर्ण संतुष्ट होत्साता भक्तांच्या अगदीं अर्ध्या वचनांत रहाण्यास तयार होतो. त्याच्या सर्वप्रकारच्या इच्छा पुरवून फार तर काय पण आपल्या ब्रह्मस्वरूपांत त्यांना मिळवून घेण्यास मागें पुढें पहात नाहीं!!! स्नान, आचमन, शौचादि, कर्मानुष्ठानाचीही भक्तिसाधनास अवश्यकता नाहीं; इतकी ती सोपी आहे. भगवत्कथा श्रवण, पूजन, कीर्तनादि जीं भक्तिसाधनें यांचा एकनिष्टेनें आश्रय केला ह्मणजे झालें. आपणांस परमप्रिय असलेल्या भक्तिमार्गाचीं साधनें परमेश्वर सांगतात.

" श्रद्धामृतकथायां मे शश्वन्मदनुकीर्तनम् ।
परिनिष्ठा च पूजायां स्तुतिभिः स्तवनं मम ॥ १ ॥
आदरः परिचर्यायां सर्वाङ्गैरभिवन्दनम् ।
मद्भक्तपूजाऽभ्यधिका सर्वभूतेषु मन्मतिः ॥ २ ॥
मदर्थेष्वङ्गचेष्टा च वचसा मद्गुणेरणम् ।
मय्यर्पणं च मनसः सर्वकाम विवर्जनम् ॥ ३ ॥
मदर्थेऽर्थ परित्यागो भोगस्य च सुखस्यच ।

इष्टं दत्तं हुतं जप्तं मदर्थं यद्व्रतं तपः ॥ ४ ॥
एव धर्मैर्मनुष्यानामुद्धवात्म निवेदिनाम् ।
मयि संजायते भक्तिः कोऽन्योऽर्थो स्याऽवशिष्यते "

हीं वर सांगितलेली भक्तिसाधनें प्रशस्त तर खरींच पण त्यांतलेत्यात मुख्य ह्मटलें तर नामसंकीर्तनच होय, त्याचा महिमा फार अगम्य आहे.

---

## प्रकरण नववें.

# नाममहिमा.

कृतादिषु तपःकर्म पूजनं पावनं हरेः ॥
कलौतु केवलं नाम निःश्रेयसमहोदयम् ॥ १०४ ॥

ब्राह्मणांना खरा मोक्षसाधनाचा मार्ग ह्मटला ह्मणजे वेदाध्ययन करणें आणि श्रौतस्मार्तकर्माचरण विधिपूर्वक करून ईश्वरपूजनादि आचरणें हाच होय. परंतु हल्लींच्या काळीं हीं सर्व कृत्यें सांगतापूर्वक पार पडणें कठीण जातें. कृत, किंवा द्वापार, आणि कलियुग, यामध्यें महदंतर आहे. कारण त्यां मागील दोन युगांतील काल व परिस्थिति यज्ञयागादि कर्मे निर्विघ्नपणें आचरण्यास फार अनुकूल असी होती. सद्यस्थितींत त्याचाच अवलंब करूं ह्मटलें तर चालणार नाहीं. फार कशाला पांच पन्नास वर्षांपूर्वींच तीर्थ यात्रादि कर्मे जशीं यथाविधि करावयास सांपडत असत तशीं तीं आतां करणें कठीण झालें आहे !! निरनिराळ्या युगांचे-ठायीं असलेल्या ईश्वराच्या सगुण स्वरूपाचें वर्णन देऊन

त्या त्या वेळीं मनुष्यप्राणी त्याची आराधना कोणत्या प्रकारें करीत असत हें खालील उताऱ्यांत अति उत्तम प्रकारें वर्णिलें आहेः—

" कृते शुक्लश्चतुर्बाहुर्जटिलोवल्कलाम्बरः ।
कृष्णाजिनोपवीताक्षोबिभ्रद्दण्डकमण्डलू ॥ १ ॥ "
" मनुष्यास्तुतदा शान्ता निर्वैराः सुहृदः समाः ।
यजन्ति तपसा देवं शमेन च दमेन च ॥ २ ॥
" त्रेतायां रक्तवर्णोऽसौचतुर्बाहुस्त्रिमेखलः ।
हिरण्यकेशस्त्रय्यात्माश्रुक्स्रुवाद्युपलक्षणः ॥ ३ ॥
" तं तदा मनुजा देवं सर्वदेवमयं हरिम् ।
यजन्ति विद्ययात्रय्या धर्मिष्ठा ब्रह्मवादिनः ॥ ४ ॥
" द्वापारे भगवाञ्छ्यामः पीतवासा निजायुधा ।
श्री वत्सादिभिरङ्कैश्च लक्षणैरुपलक्षितः ॥ ५ ॥ "
" नाना तन्त्र विधानेन कलावपि यथा श्रुणु ।
कृष्णवर्णं त्विषा कृष्णं साङ्गोपाङ्गास्त्रपारगम् ॥ ६ ॥
यज्ञैः संकीर्तनै प्रायोयजन्ति हि सुमेधसाः ॥ "

सारांश कलियुगाचे ठायीं नामसंकीर्त्तनासारखा ईश्वरप्राप्तीस सुलभ असा दुसरा उपाय नाहीं. तप, यज्ञ किंवा ईश्वरपूजनादि जीं साधनें आहेत त्या सर्वांपेक्षांही नामाचा महिमा विशेष आहे. पूजनादिकांपासूनही प्राप्त न होणारी फलें नामप्रतापानें साध्य होतात. उपासना प्रथमतः केल्याखेरीज चित्तैकाग्रतेची सिद्धि होत नाहीं, ह्मणून मागें सांगितलेंच आहे. त्याचप्रमाणें नामस्मरणावांचून तपोयज्ञादि क्रियांची सांगता होत नाहीं. स्मृतींत ह्मटलें आहे—

" यस्यस्मृत्याचनामोक्त्या तपोयज्ञक्रियादिषु ।
न्यूनंसंपूर्णतां याति सद्यो वन्दे तमच्युतम् । १ । "

आणि कलियुगामध्यें तर तपादि साधनाखेरीज ही सिद्धि केवळ नामस्मरणानेंच होणारी आहे. पुन्हां स्मृतींतीलच आधार पहा:-

" कृते यध्यायतो विष्णुं त्रेतायां यजतो मखैः ।
द्वापारे परिचर्यायां कलौ तद्धरिकीर्त्तनात् ॥ १ ॥
यत्कृते दशभिर्वर्षैस्त्रेतायां हायनेन तत् ।
द्वापारे तच्चमासेन अहोरात्रेण तत्कलौ ॥ २ ॥ "

" कृतयुगांत विष्णूचें ध्यान करून, त्रेतायुगांत यज्ञयाग करून किंवा द्वापारांत हरिपूजनेंकरून जी सिद्धि प्राप्त होणारी आहे ती कलिमध्यें केवळ हरिकीर्तनापासून तात्काळ प्राप्त होते." मागील तिन्ही युगांतून आयुष्यमर्यादा अधीक होती, ह्मणून तपादिकांची सिद्धिही उशीरानें होत होती हें बरोबर आहे पण कलिमध्यें आयुष्य अल्प आहे ह्मणून नामसंकीर्त्तनापासून मिळणारी सिद्धि अगदींच अल्पकाळांत प्राप्त होते हें कसें? तर त्यावर पुरावा पहा. " कृतयुगांत दहा वर्षांनीं प्राप्त होणारी सिद्धि त्रेतायुगांत एक वर्षानें होते. द्वापारांत एका महिन्यानें आणि कलिमध्यें तर एक रात्र व एक दिवस एवढ्या अवधींत ती साध्य होते " !!!

" कृतादिषु प्रजा राजन् कला विच्छन्ति संभवम् ।
कलौ खलु भविष्यन्ति नारायणपरायणाः ॥ १ ॥
" कलिं संभावयन्त्यार्या गुणज्ञाः सारभागिनः ।

यत्र संकीर्तने नैव सर्वं स्वार्थोऽभि लभ्यते ॥ २ ॥"

श्रीमद्भागवत्-

अशा प्रकारें कलियुगांत केवळ हरीनामसंकीर्त्तनाचे योगेंकरून सर्व अभिष्ट हेतु सिद्ध होतात असें पाहून कृतयुगांतील लोक कलिमध्यें पुन्हां आपणांस पुनर्जन्म मिळावा अशी इच्छा करतात. कां करणार नाहींत?

आतां हें नाममहात्म्य केवळ पुराण प्रसिद्ध आहे एवढेंच नाहीं तर श्रौतकालापासूनही त्याची मोठी आख्या आहे. अथर्वशीर्षोपनिषदांत नारदमुनी ब्रह्मदेवापाशीं जाऊन प्रश्न करतात कीं, " देवा पृथ्वीवर भ्रमण करतांना म्यां कलिसंतरण कसें करावें? " ब्रह्मदेव ह्मणतात, " फार चांगला प्रश्न केलास. श्रुति पुराणादिकांचें रहस्य मी तुला निवेदन करितों. केवल नारायणाचा नाममहिमा गायिला असतां तूं कलीमधून तरून जाण्यास समर्थ होशील. " हरेराम इत्यादि षोडशाक्षरी मंत्राच्या पठणानें सकल हेतू परिपूर्ण होतात. सर्व वेद धुंडाळले तरी यावांचून अन्य सुलभसा उपाय सांपडणें कठीण! या षोडशाक्षरी मंत्राच्या सामर्थ्येंकरून षोडशकलावृत जीवाची मुक्तता होते. ब्राह्मणांना वेदपठनापासून अभीष्ट सिद्धि होते ह्मणशील तर कलिचेठायीं शौचाचारादि वेदमर्यादांचें पालन होऊं शकत नसल्यामुळें वेदपठणापासून उक्तफलप्राप्ति होत नाहीं; ह्मणून ब्राह्मणांनाही नामपठन हाच चांगला उपाय आहे. " यावर नारद पुन्हां विचारतात, " तर मग हे कृपानिधे, सर्वज्ञमूर्ते, या नाममंत्रास योग्य असा दीक्षाविधि कोणता तें कृपा करून सांगावें. "

ब्रह्मदेव उत्तर करतात, " बाबारे, यास दीक्षेची वगैरे कसलीही जरूरी नाहीं, शुचि किंवा अशुचि कसलाही असलास तरी नामसंकीर्त्तन ईश्वरास पावतें. त्याचप्रमाणें त्यास वेळ अवेळही नाहीं."

वेदपठणाची गोष्ट तशी नाहीं; ते आचारपूर्वक झाले तरच त्यांचा कांहा उपयोग होणार आहे. नाहीं तर उलट पाप मात्र पदरीं जडावयाचें. धृतराष्ट्रानें वेद पठना पासून पाप क्षय होतो किंवा नाहीं असा प्रश्न सनत्सुजाताप्रत केल्यावरून तो उत्तर करतोः—

" नैनं सामान्यृचोऽवापिन यजूंष्य विचक्षणम् ।
त्रायन्ते कर्मणाःपापान्नते मिथ्या ब्रवीम्यहम् ॥ १ ॥
न च्छन्दांसिवृजिनात्तारयन्तिमायाविनं मायया वर्त्तमानम् । नीडं शकुन्त्यैवजात पक्षाश्छन्दास्येनं प्रजहन्त्य काले ॥ २ ॥ मन्त्रोहीनःस्वरतोवर्णतोवा मिथ्याप्रयुक्तो न तदर्थमाह । स वाग्वज्रो यजमानं हिनस्ति यथेन्द्रशत्रुःस्वरतोपराधात् ॥ ३ ॥
यस्त्वाचार विहीनोऽपि विद्वान्वेदपरायणः ।
सर्वधर्म बहिःकार्यो यथा शूद्रस्तथैव सः ॥ ४ ॥ "

" स्नानापूर्वी, अशुद्धकालीं किंवा शूद्रादि संन्निध असतांना वेदपठ । करूं नये. ही जी विचक्षणा ती विचक्षणा शून्य, वेदार्थानभिज्ञ अशा लोकांचें पापक्षालन वेद पठनानें व्हावयाचें नाहीं. त्याचप्रमाणें मंत्रोच्चार करतांना स्वर किंवा वर्ण चुकले तर चांगलें व्हावयाचे ऐवजीं अनर्थ मात्र होतो. "एखादा विद्वान ब्राह्मण नित्य वेदाभ्यासयुक्त असा

आहे पण त्यास आचार नाहीं तर त्याची किंमत शूद्रादिकां पेक्षांही अधिक नाहीं. तात्पर्य, विहिताचारादि दोषांमुळें वेदपठनापासून नामस्मरणा सारखी फलसिद्धि होत नाहीं हें निर्विवाद सिद्ध झालें.

कलियुगाचे ठायीं जर काहीं गुण असला तर तो हाच आहे कीं, फक्त नामसंकीर्त्तनानें मनुष्य मात्र संसारबंधनांतून मुक्त होतात. आतां ज्ञान वैराग्यादि साधनानीं प्राप्त होणारी मुक्ति केवळ नामस्मरणानें कशी प्राप्त होते असें ह्मणाल तर वास्तवीक यांत कांहीं एक नवल नाहीं; कारण नाममहिमा इतका अगाध आहे कीं, ज्ञान वैराग्यादि मोक्ष साधनेंच मूळ नामस्मरणांनीं प्राप्त होणारीं आहेत. आदित्यपुराणांत अर्जुनाप्रत भगवान् सांगतातः—

" मम नामैव नामैव नामैव ममकेवलम् । गतिस्तेषां गतिस्तेषां गतिस्तेषां सुनिश्चितम् ॥ १ ॥
" श्रद्धया हेलया नाम रटन्ति मम जन्तवः ।
तेषां नाम सदा पार्थ वर्तते हृदये मम ॥ २ ॥ "

" श्रद्धापूर्वक किंवा लीलेनें जरी माझ्या नांवाचा गजर केला तरी ते पुरुष मला इतके प्रिय होतात कीं, त्यांची विस्मृती मला कधींही होत नाहीं. फक्त त्यांची सदा स्मृति राहते एवढेंच नाही तर मी त्यांच्या सर्वस्वी आधीन होतों. "

" येकेचित्प्राणिनो भक्ता मदर्थेत्यक्त बान्धवाः ।
तेषामहं परिक्रांतो नान्यक्रीतो जनार्दनः ॥ १ ॥

"कृष्ण कृष्णेति यो गीत्वा प्रयाति भवनं नरः ।
तस्यानुगमनं पार्थ सत्यं सत्यं करोम्यहम् ॥२॥"

ज्या लोकानीं मजकरितां आपल्या बंधुवर्गाचाहि त्याग केला आहे त्यांचा मी दास बनतों. "कृष्ण, कृष्ण" ह्मणत जो घरीं जातो त्याचे पाठीमागें मला हुजऱ्या प्रमाणें जावें लागतें. अशा भक्तजनांना विरागादि साधनें प्राप्त होऊन मोक्ष देखील कसा अनायासें प्राप्त होतो पहा—

"नामैव परमामुक्तिर्नामैव परमागतिः ।
नामैव परमाशक्तिर्नामैव परमास्थितिः ॥ १ ॥
नामैव जनयत्याशुवैराग्यं विषयादिषु ।
हरेर्नामानि कर्माणि प्रशस्तानि युगे युगे ॥ २ ॥
मम नाम सदा ग्राही मम नाम सदा प्रियः ।
सजित्वा सकलाल्लोकान् मामाप्नोत्येव तत्वतः ॥३
नामयुक्ताजनाकेचिज्जात्यन्त मताअपि ।
कुर्वन्ति मे यथा प्रीतिं न तथा वेद पारगाः ॥ ४ ॥
ये नामयुक्ताविचरन्तिभूमौ त्यक्त्वातुकामान्वि-
षयांश्च भोगान् ॥ तेषांहिभक्तिं परमां सुनिष्ठां
दास्यामि सत्यं मम शान्तियुक्ताम ॥ ५ ॥ "

माझें नांव हीच एक अद्भुत शक्ति आहे. परमागति किंवा परमस्थिती ही त्यांतच आहे. नामस्मरणानें ज्ञानप्राप्तीस फार अवश्यक असें जें वैराग्य तें प्राप्त होतें. तसेंच त्यासारखें प्रशस्त कर्माचरण दुसरें कोणतेंही नाहीं. ज्यांना माझें नाम प्रिय असून जे त्याचें नेहमीं ग्रहण क-

रितात ते स्वर्गादि सकल लोक सहज जिंकूं शकतात. किं-त्येक लोक भ्रष्ट झालेले असूनही ते जर नामयुक्त आहेत तर मग वेदपारंगतांचीही त्यांजपुढें मला किंमत नाही. जे लोक आपल्या सर्व प्रकारच्या विषयवासनांस फांटा देऊन माझ्या नामपठनाखेरीज दुसरा धंदा जाणत नाहींत त्याचेवर मी पूर्ण प्रसन्न होऊन त्यांना माझी अचल अशी पराभक्ति अर्पण करितों."

नामस्मरणावांचून केलेलें कर्म निष्फळ होतें; परंतु नामसंकीर्तनास मात्र कर्माची अवश्यकता नाहीं.—

"त्यक्त्वात मम नामानि कर्म कुर्वन्ति चाखिलम् ।
तेषां तत्कर्म बन्धाय न सुखाय कदाचन ॥ १ ॥
स्मरन्ति मम नामानि ये त्यक्त्वा कर्म चाखिलम् ।
तेषां कर्माणि कुर्वन्ति ऋषयो मम वल्लभाः ॥ २ ॥
विसृज्य मम नामानि कुर्वन्ति कर्म चाखिलम् ।
न कर्मणां फलं तेषां नात्राश्चर्यं धनञ्जय ॥ ३ ॥
तस्मान्नामानिकौन्तेय भजस्वदृढ मानसः ।
नामयुक्तः प्रियोऽस्माकं कर्मयुक्तस्तथा न हि ॥ ४ ॥
निर्विण्ण चेतसो ये वै नाम गायन्ति जन्तवः ।
मध्ये तेषामहं स्थाता कोऽन्यस्तस्मात्प्रियोऽर्जुन॥५॥"

"नामसंकीर्तनाचा त्याग करून जे कर्माचरण करितात त्यांचें तें कर्म त्यांना सुखप्रद न होतां उलट संसारबंधनास मात्र कारण होतें. आतां कर्मत्याग करून फक्त नामस्मरण करीत बसणाऱ्यांचीं कर्मे कोण करतो ह्मणाल तर तीं माझ्या परमप्रिय अशा ऋषीवर्यांनीच सर्व करून

टाकिली आहेत. माझे नामाचा त्याग करून कर्माचरण करणाऱ्या लोकांना मुळींच कांहीं फलप्राप्ति होत नाहीं, धनंजया यांत फारसें नवल नाहीं; यास्तव तूं दृढ मानसें-करून नामस्मरण करीत जा. कारण जे नामयुक्त नाहींत ते मला कधींही आवडत नाहींत. एकभावेंकरून जे मला माझ्या अनेकप्रकारच्या नांवांनीं आळवितात त्यांचे मेळ्यांत मी नेहमी असतों. त्यांच्यापेक्षां अधिक प्रिय असें मला कांहींच नाहीं."

असो. आतां यावरील विधानांवरून जर कोणी असें ह्मणण्याचें धाडस करील कीं, श्रौतस्मार्तविधींचें अनुष्ठान, वेदाध्ययन वगैरे सर्व कर्मं पूर्णपणें सोडून द्यावींत, तर ही मोठी चूक आहे. विहिताचारास बुद्धिपुरःसर फांटा देणें ह्मणजे महान् महान् दोषांस अधिकारी होण्यासारखें आहे. ते दोष श्रुतींत श्रद्धा, विहित त्याग, सन्निंदा वगैरे दहा प्रकारचे सांगितले आहेत. ते सूज्ञांनीं विनाकारण पदरीं बांधून घेऊं नयेत. त्यांतून अहर्निश नामस्मरणाचे-योगानें भगवच्चरणीं अत्यंत प्रीति जडून हरिनामाखेरीज ज्यांना दुसरे कशांत गोडीच वाटेनाशी झाली असेल त्यांची गोष्ट वेगळी. त्याना कर्माचरणाचा प्रतिबंध कोण करणार ?

अशाप्रकारचा हा नाममहिमा फार अगाध आहे. त्याचें यथासांग वर्णन कोण करूं शकेल ?

पद्मनाभारविन्दाक्ष भक्ताभय कराम्बुज ।
दर्शय श्री मुखाम्भोजं प्रणतं ते पदाम्बुजे ॥१०८॥
एवं प्रार्थयतः शीघ्रं भगवान्भक्तवत्सलः ।
आविर्भवति हृत्पद्मे भक्तस्याघौघनाशनः ॥१०९॥

नामसंकीर्त्तनाचेयोगेंकरून एकदां भगवच्चरणीं प्रेम जडलें ह्मणजे भक्तजनांनीं ईश चरणीं कशी प्रार्थना करावी? त्याजपाशीं तो आपणांस आपल्या निरपेक्ष भक्तीचा मोबदला देण्यास तयार झाला ह्मणजे काय मागावें? हत्ती, घोडे वगैरे ऐश्वर्य संपत्ति थोडीच मागावयाची आहे! "हे पद्मनाभ, हे अरविंदाक्ष, हे करुणासागर?" अशाप्रकारें त्यास संबोधून मागावयाचें एवढेंच कीं, प्रभो! मी तुला अनन्यभावानें शरण आलों आहे; तर मज दीनावर कृपादृष्टी करून मला एकदां आपल्या सकल सौंदर्यसारभूत अशा श्री मुखांभोजाचें दर्शन व्हावें. सकल जगदाधार जें पद्म तें तूं आपल्या नाभीचे ठायीं धारण करितोस. तुझे नेत्र अरविंद ह्मणजे कमलपुष्पाप्रमाणें सुकोमल असे आहेत. त्याचे ठायीं अशी एक अद्भुत मोहक शक्ती आहे कीं, आह्मां भक्तजनांना आपली दृष्टी त्यांजवरून एक क्षणभर सुद्धा काढवत नाहीं. तुझ्या लोकोत्तर सौंदर्यामुळें आमच्या चित्तवृत्ति तुझेठायीं इतक्या आकर्षून गेल्या आहेत कीं, आह्मांस तुजव्यतिरिक्त दुसरा कोणता धंदाच उरला नाहीं. तर हे भक्तवत्सला! त्वां आमचें हें तुझ्या दर्शनाचें कोड कसेंही करून पुरवावें. आतां तूं तें मुळींच पुरविणार नाहींस असें आमचें अगदींच ह्मणणें नाहीं, कारण तुला भक्ताभयकरांबुज असेंच ह्मटलेलें आहे."

अशाप्रकारें विनयपूर्वक ईशस्तवन केलें असतां तो भक्तवत्सल तावडतोब भक्तांचे हृदयकमलाचेठायीं प्रगट होतो. मग तेथें अज्ञानास जागाच रहात नाहीं. अज्ञान तिमिराचा एकदां नाश झाला ह्मणजे मेघपटलें दूर झालीं

असतां जसें सूर्यबिंब आपल्या अतुलप्रकाशानें नभोमंडलाचे ठायीं प्रगट होतें तद्वतच अंतःकरणाची स्थिति होऊन चोहोंकडे काशच प्रकाश होऊन जातो. यावरून हें सिद्ध होतें कीं, शमदमादि साधनश्रमावांचून केवळ ईशदयेच्या योगानें भगवद्भक्तांची अज्ञान निवृत्ति जाऊन ते परम ज्ञानसंपन्न होतात. भगवद्गीतेंत ह्मटलें आहेः—

" तेषां सततयुक्तानां भजतां प्रीतिपूर्वकम् ।
ददामि बुद्धियोगं तं येन मामुपयान्ति ते ॥ १ ॥
" तेषामेवानुकम्पार्थ महमज्ञानजं तमः ।
नाशयाम्यात्मभावस्थो ज्ञानदीपेन भास्वता ॥ २ ॥"

निष्कपटपणे प्रीतिपूर्वक जे भगवंताचें भजन-पूजन करतात त्यांना ईश्वरप्राप्तीचा राजमार्ग जो बुद्धियोग तो प्राप्त होतो. ईश्वरआत्मभावस्थ ह्मणजे अंतःकरण वृत्ति रूपानें मनुष्यमात्राचे हृत्कमलीं वास करीत असल्यामुळें तो आपल्या अद्वितीय आत्म तेजाचे योगेंकरून तेथें तेजस्वी असा ज्ञानदीप उज्वल करतो. त्या ज्ञानदीपाचा प्रभाव इतका विलक्षण आहे कीं, मग तेथें अज्ञान तिमिराचा मुळीं सुद्धा रिघाव होत नाहीं. त्या निष्कपट भक्तांना मग अशी कांही अद्वितीय स्थिति प्राप्त होते कीं, तिचा चांगुलपणा पाहून स्वर्ग व मोक्ष ह्यासुद्धां आडवाटा आहेत असें त्यास वाटावयास लागतें. सारांश. ईश्वरास भजनाची फार आवड आहे. योगाचीही त्यापुढें त्यास मातब्बरी वाटत नाहीं, ह्मणूनच नारदास भगवान् ह्मणतातः—

" नाहं वसामि वैकुण्ठे योगिनां हृदये रवौ ।
मद्भक्ता यत्र गायन्ति तत्र तिष्ठामि नारद ॥१॥"

## प्रकरण दहावें.

# भक्तीचीं कांहीं अन्य साधनें.

तथैव कारणं भक्तेरेकादश्याद्युपोषणम् ।
जन्माष्टम्यादि पर्वाणि हरेस्तुष्टिकराणि च ॥१०७॥
तथा महोत्सवः कार्यो जन्माष्टम्यादि पर्वसु ।
उत्सवे नाधिका भक्तिः श्रीकृष्णे जायते कलौ ।१०८

नामस्मरण हें जसें भक्तीचें एक मुख्य साधन सांगितलें, त्याचप्रमाणें एकादश्यादिकरून व्रतोपोषणेंहि आमच्या भक्तिकल्पलतेचा रत्यंकुर सुदृढ करण्यास विशेष कारणीभूत होतात. श्रीराम, कृष्ण, नृसिंह, व वामन, यांच्या जयन्त्या व शिवरात्रि हीं भगवद्भक्तांचीं पांच पर्वें पाळल्यापासून परमेश्वरास परम संतोष होतो. या पांच दिवशीं सर्वत्रांनीं उपोषणें अवश्य करावींत. कृष्णाष्टमी मी करीन, शिवरात्र मी कां पाळावी असा दुराग्रह धरणें मूर्खपणाचें काम आहे, हरिहराचे ठायीं भिन्नभाव मुळींच असतां कामानये. आतां तुह्मांस एकादा विशेष अवतार अधिक प्रिय आहे तर तुह्मीं त्या विशिष्ट दैवताची आराधना करा; पण अन्य दैवतांची उपेक्षा करणें हा मार्ग गौण होय. त्याच प्रमाणें जन्माष्टमी आदिकरून ज्या ज्या दिवशीं प्रभुभक्तसंकट निरसनार्थ या मर्त्य भूमिवर अवतीर्ण होऊन आले त्या त्या दिवशीं, भगवत्पूजन, कीर्तन, श्रवणब्राह्मणसंतर्पण वगैरे अनेक प्रकारें मोठा उत्सव करावा,

भगवंताचें मंदीर सुशोभित करण्यांत, साधुसंतांची सुश्रषा ठेवण्यांत अगदीं अंग मोडून मेहनत करावी, त्यांत कोणत्याही प्रकारची कसूर करूं नये, असल्या प्रकारच्या उत्सवांच्या योगें करून अनेक प्रकारचीं भगवंताच्या लीलांची वर्णनें कानीं पडल्यामुळें भगवच्चरणीं अधीक प्रेम जडतें. ह्मणून भक्तिलाभाची ज्यांनां इच्छा आहे अशा लोकानीं हे उत्सव अगत्यपूर्वक करावेत. भागवत महात्म्यांत भक्तिप्रत नारद ह्मणतात--

" कलिना सदृशः कोऽपि युगोनास्तिवरानने ।
तस्मिंस्त्वां स्थापइष्यामि गेहे गेहे जने वने ॥ १ ॥
अन्यधर्मान् परित्यज्य पुरस्कृत्य महोत्सवान् ।
तदाचाहं हरेर्दासो लोके त्वां तु प्रवर्तये ॥ २ ॥"

" हे वरानने! भक्तिदेवी! कलियुगा सारखें दुसरें युग नाहीं. त्या युगामध्यें मी घरीं, दारीं, अरण्यांतून देखील तुझी स्थापना करून देईन. विहिताचार वगैरे दुसरे सर्व प्रकारचे धर्म टांकवून लोकांमध्यें महोत्सवांचा परिपाठ पाडीन व तुझी महति सर्वत्र सारखी वाढवीन; तरच मी खरा भगवद्भक्त असें समज."

सारांश असे हे महोत्सव करण्या पासून भक्ति सुदृढ होऊन भगवत्प्रसाद तात्काल प्राप्त होतो. आतां हे उत्सव कोणत्या प्रकारें करावेत हें थोडेंसें विस्तृतपणें सांगतों.

गीत ताण्डव वादित्रैः स्वाद्वन्नैर्द्विज तर्पणैः ।
सद्भिर्महोत्सवः कार्यो गायद्भिश्च यशो हरेः ।१०९

हे जन्मोत्सव साजरे करण्याचा शिष्टसांप्रदाय प्रचल

ह्मणजे असा आहे कीं, प्रथम ललित पदनिबंधांनीं सुस्वर आवाजांत हरीचे गुण गावेत, मंगलवाद्यांचा गजर करावा आणि सरतेशेवटीं ब्राह्मणास मिष्टान्न भोजनें घालावींत. ब्राह्मण संतर्पणा पासून परमेश्वरास फार संतोष होतो.

ब्राह्मणांस देवाची साकार मूर्ति समजून जर उत्तम प्रकारच्या पदार्थांचें त्यांना भोजन घातलें तर परमेश्वरास जसा संतोष होतो तसा होमहवनादिकांनींही होत नाहीं.

आतां हे ब्राह्मण सत्पात्र पाहिजेत. फक्त ब्राह्मण कुलांत जन्म झाला ह्मणजे तो ब्राह्मण होतो असें नाहीं. खरे ब्राह्मण कसे असतात व त्यांचा अधिकार केवढा असतो ह्याचें वर्णन करीत असतां भगवान ह्मणतात, " जे ब्राह्मण श्रद्धा, तप, सदाचार आणि जीतेंद्रियता या साधन चतुष्टयाचे साह्यानें वेदाध्यन करून, त्यांतील गूढ अर्थावर चित्तैकाग्रतेनें विचार करतात त्यांच्या चरण धूळीचे रजःकण आपल्या मुगुटावर धारण करण्याची मला फार हौस आहे कारण तसें केलें असतां कोणत्याही प्रकारच्या पातकांची राखरांगोळी होऊन त्या ब्रह्मनिष्ठांप्रमाणें अंगीं पात्रताही पण येते!" असो. आतां या जन्ममहोत्सवातून आणखी काय काय गोष्टी कराव्या लागतात तें उद्धवाप्रत श्री भगवानांनीं सांगितलें आहे. त्या सर्व गोष्टी जे पूर्ण भक्तिभावानें आचरितात. त्यांना खरे भक्त ह्मटलें पाहिजे, कारण त्या गोष्टीच तशा कसोटी घेणाऱ्या आहेतः—

" मल्लिङ्गस्यच भक्तस्य दर्शनस्पर्शनार्चनम् ।
परिचर्या स्तुतिःप्रह्व गुणकर्मानु कीर्त्तनम् ॥ १ ॥
" मत्कथाश्रवणेश्रद्धा मदनुध्यानमुद्धव ।
सर्व लाभोपहरणं दास्येनात्म निवेदनम् ॥ २ ॥

"मज्जन्म कर्म कथनं मम पर्वानुमोदनम् ।
गीत ताण्डववादित्र गोष्ठीभिर्मद्गृहोत्सवः ॥ ३ ॥
"यात्रा बलि विधानंच सर्व वार्षिक पर्वसु ।
वैदिकी तान्त्रिकी दीक्षा मदीय व्रत धारणम् ॥४॥
"ममार्चा स्थापने श्रद्धा स्वतः संहत्यचोद्यमः ।
उद्यानो पवना क्रीड पुरमन्दिर कर्मणि ॥ ५ ॥
"संमार्जनोपलेपाभ्यां सेकमण्डल वर्तनैः ।
गृहशुश्रूषणं मह्यं दासवद्य दमायया ॥ ६ ॥
"अमानित्वमदम्भित्व कृतस्यापरि कीर्तनम् ।
अपि दीपावलोकं मे नोपयुञ्ज्यान्निवेदितम् ॥ ७ ॥
"यद्यदिष्ट तमं लोके यच्चातिप्रियमात्मनः ।
तत्तन्निवेदयेमह्य तदान्त्यायकल्पते ॥ ८ ॥"

"हे उद्धवा! माझ्या प्रतिमादि चिन्हांचें, व भक्तांचें दर्शन घेणें, पूजा, अर्चा, स्तुति, भगवल्लीलेचीं वर्णनें, माझ्या कथेचे ठायीं श्रद्धा, माझें ध्यान, मला सर्व अर्पण करणें, माझ्या अनेक अवतारांतील प्रबळ कथा, गान वादनादि साहित्यांनी अशी माझा जन्मोत्सव करणें; यात्रा, बलिप्रदान, वैदिकी व तांत्रिकी दीक्षा, माझीं व्रतें पाळणें, माझ्या स्थापेत प्रतिमेवर श्रद्धा ठेवणें, भजनकरिता बाग, उपवन, किंवा मंदिर करण्यास स्वतः किंवा दुसऱ्याबरोबर अंग मोडून मेहनत करणें माझें मंदिरांत संमार्जन करणें; कोठें त्यांत कांहीं मोडतोड पडले असता, त्याची डागडुजी करणें, वृथाभिमानाचा त्याग करणें; पाखण्ड सोडून देणें; विहिताचारास धरून चालणें; हीं सर्व खऱ्या

भक्तीचीं लक्षणें होत; त्याचप्रमाणें मला अर्पण केलेल्या पदार्थांचें सेवन न करणें, दिव्याचा प्रकाशही उपयोगांत न आणणें, आपल्या फार आवडीचा जिन्नस वर्ज करणें, इत्यादिकांपासून फार मोठी फलप्राप्ति आहे."

---

## प्रकरण अकरावें.

# भक्तांचा योगक्षेम कोण चालवितो?

एवं भजनशीलाना मप्यज्ञानां हरिर्भवेत्।
स्वभक्तानां समुद्धर्ता मृत्युसंसारसागरात्॥११०॥

वर सांगितल्याप्रमाणें जे जन्माष्टमीसारख्या पुण्य दिवशीं महोत्सव करून श्रवण कीर्तनादि व्यापारांनीं भगवद्भजन करतात त्या प्रेमयुक्त भगवद्भक्तांचें मग ते ज्ञानविरहित कां असेनात या संसारार्णवांतून परमेश्वर रक्षण करतो. ईश्वरभजनाशिवाय दुसरें ज्याना चांगलें ह्मणून कांहीं दिसतच नाहीं अशा अनन्यगतिक चित्तानें त्याची उपासना करणारांची सर्व प्रकारची चिंता सर्वतोपरी त्या भक्तवत्सलासच असते. गीतेंत ह्मटलें आहे:—

"ये तु सर्वाणि कर्माणि मयि संन्यस्य मत्पराः।
अनन्ये नैव योगेन मां ध्यायन्त उपासते॥ १॥

"तेषामहं समुद्धर्ता मृत्युसंसारसागरात्।
भवामि न चिरात्पार्थ मय्यावेषित चेतसाम्॥२॥"

कायावाचामनेंकरून उत्पन्न होणारीं सर्व कर्मे जे परमेश्वरास अर्पण करून अनन्यभावानें त्याची उपासना करतात त्या एकनिष्ट भक्तांचें तो काय ह्मणून करीत नाहीं? सर्व काहीं करतो. त्यांना संसारसागरांतून पैलतीरास नेण्याचा तर त्यानें मक्ताच घेतला आहे; कारण ब्रह्मार्पणाचा महिमाच तसा आहे. कर्तव्यकर्मे यथाविधि आचरून तीं ईश्वरार्पण केलीं असतां कर्मफलें दग्ध होऊन जातात; मग त्यावर संसारबंधनाचा तो काय परिणाम होणार? संसार शकट कसा चालवावा ही चिंताही पण त्यांना करावी लागत नाहीं, कारण त्यांनीं एकनिष्टरूप मोठा पगार देऊन कर्तव्यदक्ष असा एक कारभारी आपले घरीं ठेविलेला असतो. यच्चावत सर्व कृत्यांवर त्याची पूर्ण देखरेख असते. न्यून ह्मणून त्याचे अमदानींत कोठेंही पडावयाचें नाहीं. याचें प्रत्यंतर या जगांत हजारों वेळां आलेलें आहे.

भगवंतानीं आपल्या अनेक अवतारांतून सगुण स्वरूपें धारण केलीं यांतलें गुह्य तरी हेंच आहे महा भयंकर अशा या संसारार्णवाचें उग्ररूप पाहून गर्भगळीत झालेल्या प्राणिमात्रांस धीर देऊन त्यांना पैलतीरास नेण्यास मदत करतां यावी हाच त्याचा उद्देश होय निरनिराळ्या नामांच्या हजारों नांवा करून भगवान या संसारोदधीमध्यें स्वतः तारूं झाले आहेत. कोणास ध्यानाचे कांसेस लावावें, कोणास आपल्या नामरूप नौकेंत बसवावें, कोणाचे पोटाखालीं प्रेमाची सांगड द्यावी, अशाप्रकारें करून त्यांना सायुज्याचे किनाऱ्यास लावावयाचा त्यांचा क्रम जगाचे आरंभापासून अव्याहतपणें चाललेला आहे. ह्यामुळें भक्त

जनांना कोणत्याही प्रकारची स्वतःबद्दलची चिंता तिळ-प्रायही करावी लागत नाहीं.

" आतां या सगुण स्वरूपाची भक्ति केल्यापासून या भक्त लोकांना फार तर सगुणप्राप्तिच होईल. निष्कलंक असें ब्रह्म त्यांना कसें साध्य होणार आहे ? " असें कोणी ह्मणेल तर तें चूक आहे, हें खालील भगवदुक्तीवरून दिसून येईल.

" तमेव परमात्मानं जारबुद्ध्यापि संगताः ।
जहुर्गुणमयं देहं सद्यः प्रक्षीणबन्धनाः ॥ "

सगुणस्वरूप जो श्रीकृष्णपरमात्मा त्याचे ठायीं जार-जबुद्धीनें का अनन्यभावेंकरून प्रेम करणाऱ्या गोपींना अक्षय व निष्कलंक अशा निर्गुण स्वरूपाची प्राप्ति झाली.

अतः ... भक्तिर्भक्तांना यदणीश्वरः ।
भक्ति ... मुमुक्षुभ्यो भवत्येवाऽनृणीहरि ॥ १११ ॥

अनन्य भक्तीचा महिमा असा अगाध आहे. भगवच्चरणी भक्ति केवळ पत्रपुष्पांच्या अर्पणें करून जडते ह्मणून मार्गें सांगितलें खरें. पण अशी पत्रपुष्पार्पणाची इच्छा होणेंच फार कठीण आहे. जन्मांतरीच्या पुण्यसंचयानेंच केवळ अशी सदिच्छा मनांत उद्भवणार. पांडवगीतेंत नारदमुनी सांगतातः—

" जन्मान्तर सहस्रेषु तपोध्यान समाधिना ।
नराणां क्षीण पापानां कृष्णे भक्तिः प्रजायेत ॥ १ ॥ "

" तप, ध्यान, समाधि वगैरे ईशप्राप्तीच्या अनेक

उपायांमध्यें जेव्हां जन्माचे जन्म घालवावेत तेव्हां कोठें पापराशींचा विध्वंस होऊन श्रीकृष्णाचे ठायीं अनन्य भक्ति जडूं लागते." आणि ती एकदां अंतर्यामीं उत्पन्न झाली ह्मणजे मग त्या भक्तजनांना मोक्षही सुलभ होतो. पण यामुळें होतें काय तर ते ईश्वरास आपला कायमचा ऋणी करून ठेवितात. ज्ञानमार्गानें जाणाऱ्या मुमुक्षु लोकांना त्यांचा इष्ट हेतु जो मोक्ष तो देऊन परमेश्वरास त्यांच्या ऋणांतून मुक्त होतां येतें. परंतु या भक्त लोकांपुढें त्याचें कांहीएक चालत नाही. कारण खरे भक्त जे आहेत ते, "वृष्टिशिवायच समुद्र जसा जलानें तुडुंब भरलेला असतो त्याप्रमाणें सदा सर्वदा कोणत्याही उपचाराशिवाय ते संतुष्ट झालेले असतात." त्या नित्य तृप्तांना ईश्वरानें तरी काय द्यावें? ह्मणून स्वतः षड्गुणैश्वर्यसंपन्न असूनही त्यास त्या भक्त लोकांच्या ऋणामुळें सदैव त्यांचे आधीन व्हावें लागतें.

"ऋणमेतत्प्रवृद्धं मे हृदयान्नापसर्पति ।
यद्गोविन्देति चुक्रोश कृष्णा मां दूरवासिनम् ॥१॥"

कौरवसभेंत दुःशासनानें जेव्हां द्रौपदीवर हात टाकून तिचें वस्त्र हरण करण्यास आरंभ केला तेव्हां 'गोविंद गोविंद" अशी तिनें आरोळी मारल्याबरोबर श्रीकृष्णास थेट द्वारकेहून धांवत यावें लागलें. असें हें ऋण जबरदस्त आहे.

गृहदारादिजं सर्वं सुखं त्यक्त्वा स्वकर्म च ।
येऽनन्य चेतसः कृष्णं स्वात्मानं शरण गताः ॥
स कथं तानुपेक्षेत स्वभक्तान् करुणार्णवः ।

**परोऽपि भक्तितः कृष्णो यो गोपा भीम कृत्सखा ११३**

अनेक प्रकारचे परिश्रम करून मिळविलेलें द्रव्य, सेवेंत सदैव तत्पर अशी भार्या, अगदीं अघ्यां वचनांत राहणारा पुत्र वगैरे सर्व प्रकारच्या ऐहिक सुखांवर लाथ मारून, हे दयानिधे! या संसारांतून मुक्त करण्यास एक तुझ्या शिवाय कोणीही समर्थ नाहीं अशी अंतर्यामी पूर्ण गांठ मारून आह्मी विनयपूर्वक तुला शरण आलों आहोंत तर हे सच्चिदानंदा! परात्परा! देवा! तूं आह्मां दीन जनांवर आपल्या कृपादृष्टीची साउली कर." असें आर्त-स्वरानें विनवीत ज्यांनीं त्याचे पायावर लोटांगण घातलें आहे अशा प्रेमळ भक्तांची तो कधीं तरी उपेक्षा करील काय? साधारण लौकिक व्यवहारांत देखील आपला एखादा हाडवैरी पूर्ण पेंचात सांपडून जर आपणांस शरण आला तर आपण त्यावर दया करतों. मग त्या दीनवत्सलाची गोष्ट काय सांगावयाची आहे? दुर्वासऋषीप्रत भगवान हेंच सांगतातः—

"अहं भक्त पराधीनो ह्यस्वतन्त्र इव द्विज।
साधुभिर्ग्रस्तहृदयो भक्तैर्भक्त जनप्रियः ॥ १ ॥
नाहमात्मान माशासे मद्भक्तैः साधुभिर्विना।
श्रियंचात्यन्तिकी ब्रह्मन् येषांगतिरहंपरा ॥ २ ॥
ये दारागार पुत्रात्मप्राणान्वित्तमिमं परम।
हित्वा मां शरणं याताः कथंतांस्त्यक्तुमुत्सेह! ३।"

खरें पाहतां कृष्णपरमात्मा केवळ नित्य, निर्विकार असा आहे; पण भक्तजनांनीं त्यास आपले पाशांत इतकें

नसहून व गोंवून टाकिलें आहे कीं, हीनजातीज जे गोप-गोपी त्यांचे बरोबर त्यास सोयरेपणाचे नात्यानें वागावें लागलें! धन्य त्या गोकुलवासी जनांची कीं, ज्यांनीं श्रीकृष्ण नांवाचें सनातन पूर्ण ब्रह्म अगदीं आपल्या अंकित करून ठेविलें होतें, त्यांच्या सुखाकडे पाहून ब्रह्मदेवादि देखील जिभल्या चाटावयास लागले! ब्रह्मांड रचनेचें काम आपल्यावर न पडतां जर या गोकुळांत आपला जन्म झाला असता तर किती तरी चांगलें झालें असतें, असेंही त्यांस वाटावें ह्मणजे किती चमत्कारिक आहे?

---

## प्रकरण बारावें.

# भक्तमहात्म्य.

---

तस्मादीश्वर तो भाग्यं भक्तानां भाति मेऽधिकम्।
धेनोर्यथैव वत्सानां स्तन्यपानाच्च लाछनात्। ११४।

ब्रह्मदेवादिकांनाही ज्या अर्थी गोकुळांत जन्म झाला असता तर बरें झालें असतें असें वाटावयास लागलें त्या अर्थी ह्या भक्तजनांचें भाग्य कांही विलक्षणच आहे असें ह्मणावे लागतें. गाईपेक्षां तिच्या वासराचीच जोपासना अधीक काळजीपूर्वक होत; या मासल्याचीच ही गोष्ट घटली पाहिजे. वासराची गाईवर व गाईची वासरावर प्रीति पाहिली तर सारखीच असते; परंतु वासराची ज्या प्रमाणें स्तनपानापासून तृप्ति होते किंवा जिभेने चाटल्यामुळें

एक प्रकारचा आनंद प्राप्त होतो त्याप्रमाणें गाईस थोडा तरी कांहीं लाभ होणार आहे काय? नाहीं. तद्वतच त्या जगज्जननी कामधेनूस आपल्या कथामृताचा आस्वाद आपणा स्वतःसच घेतां येत नसल्या कारणानें, नृसिंह मत्स्यादि अनेक योनी धारण करून हिरण्यकशिपू, हिरण्याक्षादि तृणनिर्दलनानें झालेल्या कष्टांपासून होणाऱ्या सुखाचा लाभ तिला स्वतःस कांडीमात्र नसून प्रल्हादादि भक्तवत्सांचें मात्र त्यावर संगोपन झालें. भक्तांना दैत्योन्मथनरूप चरितामृत पयःपानाचे योगेंकरून परमानंद प्राप्त होतो ह्मणून परमेश्वरापेक्षां त्याच्या भक्तांचेंच भाग्य अधिक आहे असें ह्मणणें भाग पडतें.

**" पानेन ते देवकथा सुधायाः प्रवृद्धभक्त्याविशदाशयाये ॥ वैराग्य सारं प्रतिलभ्य बोधं यथाञ्जसाऽन्वीयुरकुण्ठधिष्ण्यम् ॥ १ ॥ "**

" ज्या मनुष्याचें अंतःकरण हरिकथामृतपानानें स्वच्छ झालें आहे, त्यास वैराग्य लाभ होऊन वैकुंठप्राप्तिही सहज होते. " श्रीमद्भागवतांत एकादशस्कंधांत ह्मटलें आहे:-

**" देवर्षिभूताप्तनृणां पितृणां न किङ्करो नायमृणी च राजन् । सर्वात्मना यः शरणं शरण्यं गतो मुकुन्दं परिहृत्य सर्वम् ॥ १ ॥ "**

" भक्त लोकांना परमानंदरूप ऐश्वर्य देऊनही ईश्वर त्यांच्या ऋणातून मुक्त होत नाहीं. पण जे भक्तजन त्या सर्व नियंत्यास कायावाचामनेंकरून शरण गेले आहेत त्यांच्या माथ्यावर मग, देवतांचें, पितरांचें किंवा कोणा-

चेंही ऋण रहात नाहीं. प्रमादवशात् त्यांचे हातून जरी एकादें निषिद्धाचरण झालें असलें तरी त्या पापाचें निवारण परमेश्वरास स्वतः होऊन करावें लागतें तो स्वतः नित्य मुक्त असा असूनही त्यास स्वभक्त संतोषार्थ नित्यमेव अवतार धारण करावे लागतात.

प्रपञ्चं निष्प्रपञ्चोऽपि विडम्बयसि भूतले ।
प्रपन्नजनतानन्द संदोहं प्रथितुं प्रभो ॥ १ ॥”

पहा भक्तांविषयी त्यास किती काळजी आहे ती!!!

भक्तिरेशस्य छित्वा मुक्त्या तुष्येत्कथं नरः ।
येन भुक्तं चिरं दुःखमविद्याप्रोत कृन्तनम्॥११५॥

असल्या प्रकारच्या ह्या मुक्त लोकांनाही ईश्वरप्राप्ति करून देणाऱ्या भाग्यदायक भक्तीचा त्याग करून केवळ मुक्तीचीच इच्छा कोण शहाणा करणार आहे ? भक्तियुक्त लोकांना तर भगवद्गुणानुवादांतच व ईशसेवेंतच एकप्रकारची विशेष गोडी असते आणि तिच्यापुढें त्यांना मोक्षाची कांहींच किंमत वाटत नाहीं, हें तर मागेंच सांगण्यांत आलें आहे, त्यांतून मोक्षही त्याना पसत पडला असता पण त्या मोक्षाचे मानानें त्यांना कष्ट अधीक पडले असल्या कारणानें त्यांची तेवढ्याशा सुखानें तृप्ति होत नाही. कारण प्रथम त्यांचे ठायी देहाभिमान वसत असल्यामुळें अज्ञानजन्य कर्मांपासून होणारीं दुःखें त्याना चिरकाल भोगावीं लागलेलीं असतात. तेथें अविद्येचे योगेंकरून त्याना सच्चिदानंद स्वरूपाची पूर्ण विस्मृति पडून मनात मी कर्ता, मी भोक्ता असा असदाभिमान उत्पन्न झाला असल्या कारणानें देह कुटुंबादि पोषणार्थ सत्कर्मवशात् प्राप्त झालेल्या

नानी योनीचे ठायीं भ्रमणरूप दुःख कल्पेंचींकल्पें पर्यंत भोगावें लागलेलें असतें. अशा प्रकारें ज्यांनीं बहुकाल असह्य दुःख सोसिलें आहे. त्यांचें केवळ मोक्ष प्राप्तीनें समाधान कसें व्हावें? आतां योगीलोकांनाही दुर्लभ जें मोक्ष सुख तें कमी आहे असें कशावरून ह्मणतां? असें जर कोणी ह्मणेल तर केवळ निदिध्यासादि साधन परिपाकानें असंभवादि विपर्यास निवृत्ति झाल्यावरून भोक्तृ भोग्यादि द्वैतशून्य जी स्थिती प्राप्त होते तीस **मोक्ष** असें ह्मणतात. तेथें ब्रह्मनिष्ठांस स्थीरता प्राप्त होऊन त्यांच्या मनोवृत्तीचे सर्व व्यापार पूर्णपणें बंद होतात. हें एवढें मोठें सुख मी भोगीत आहे वगैरे कल्पनाही त्यांस नसते; आणि देहादिकावरची आसक्ती उडून भगवन्निष्ठत्वानें जी आनंदरूपी स्थिति प्राप्त होते ती भक्ति होय. या स्थितींत त्या भक्तोत्तमास अविद्या संस्कारांवर जय मिळून मनोवृत्ति शुद्ध सत्वात्मिक अशी बनल्यामुळें परमानंद भोगावयास सांपडतो. कारण त्यांचे ठायींचा सेव्यसेवकत्वभाव लयास गेलेला नसतो. कुंडल ज्याप्रमाणें सोनें तर असतेंच पण विशिष्ट आकार प्राप्त झाल्या वरून सोन्यापेक्षांही त्यांत अधीक सौंदर्य असतें; त्या प्रमाणेंच भक्तजनांचा अंतरात्मा ईश्वरापासून भिन्न नसून ही त्यांस त्यांचा भोग्य भोक्तृत्वाचा अनुभव लयास गेला नसल्याकारणानें आपण एक अमुक प्रकारचें विशेष सुख भोगीत आहों याचें प्रत्यक्ष प्रत्यंतर घ्यावयास सांपडतें. मुक्त लोकांची गोष्ट तशी नाही. भोक्तृ भोग्याचा त्यांचा अनुभव कायम नसल्यामुळें एक कायमचें तृप्तिसुख त्यांना मिळालेलें असतें, त्यांत कधीं बदल व्हावयाचा नाहीं, किंवा मिळत आहे असा अनुभवही नाहीं. आकंठ पोट भरलेल्या मनु-

ष्यामप्राणें त्यांची स्थिती झालेली असते. आणि भक्तिमान लोकांची स्थिति एखाद्या भोजनास बसलेल्या मनुष्यास ज्या प्रमाणें मधुरान्नाचास्वाद मिळून दर घांसास त्याची सुखवृद्धि होत असते, त्या प्रकारची होय. ते मोक्षाची इच्छा करीत नाहींत याचें कारण तरी हेंच आहे. भगवत्पादसेवा व कथामृत सेवनापुढें इंद्रपदाचीही त्यांना महती वाटत नाहीं; मग मोक्षाची ती काय कथा? मनोवृत्ति कायम राहून जर मोक्षसुखापेक्षांही अधीक सुख त्यांना भक्तिसुखापासून मिळतें तर मग ते तरी तिचा अव्हेर कसा करितील! मोक्ष मिळालेल्या लोकांची स्थिती त्यांच्या मनोवृत्ति कायम नसल्यामुळें जिव्हारहित मनुष्यानें जशीं पुष्कळ मिष्टपक्कान्नें पोटांत भरीत असावें, त्या प्रकारची झालेली असते.

सारांश, भक्तियुक्त लोकांचा महिमा अगाध आहे. अनुपम्य सुखाचे वाटेकरी काय ते तेच असतात असें ह्मणावें लागतें,

**ज्ञानिनोऽप्यधिको भक्तो यतो मुक्तिं न काङ्क्षति।**
**साभक्ति मनुसंयाति राजप्रेष्यायथानुगाः ।११६।**

ज्ञानी लोकांपेक्षांही भक्तिमान लोक अधिक श्रेष्ठ गणले पाहिजेत, कारण ते ज्ञानी लोकांप्रमाणें मोक्षाची इच्छा मुळींच करीत नाहींत. भगवंताचेठायीं जडलेलें प्रेम टाकून अद्वैतावस्थितीरूप कैवल्य आपण मिळवावें असें त्यांच्या मनांतही येत नाहीं. कारण भगवच्चरणीं अनन्य भक्ति असली ह्मणजे मोक्ष हा न बोलावतांच तिचे मागून येतो. सरकार स्वारी निघाली ह्मणजे लवाजम्यास कोणी

पुकारावें लागत नाहीं; तद्वतच मोक्ष हा भक्तीचे अगदीं आधीन असतो. पद्मपुराणांत देवीभक्तीप्रत नारदमुनी ह्मणतातः—

“ सत्यादि त्रियुगे बोधवैराग्यौ मुक्तिसाधकौ ।
कलौ तु केवलं भक्तिर्ब्रह्मसंबन्धकारिणी ॥ १ ॥
इति निश्चित्य तद्रूयः सरूपां त्वां समर्जह ।
परमानन्दचिन्मूर्तिं सुंदरीं कृष्णवल्लभाम् ॥ २ ॥
बद्धाञ्जलिं त्वया पृष्टः किं करोमीति चैकदा ।
त्वां तदा ज्ञापयत्कृष्णो मद्भक्ता न्पोपयेति च ॥ ३ ॥
अङ्गीकृतं त्वया पूर्वं प्रसन्नाऽभूत्तदा प्रभुः ।
मुक्तिं दासीं ददौ तुभ्यं ज्ञान वैराग्यकाविमौ ॥ ४ ॥”

यावरून दिसून येईल कीं, केवळ भक्तीस महत्व देण्याचे उद्देशानें येथें मोक्षास गौण मानिलें नाहीं तर मूळ वस्तुस्थितिच तशी आहे. त्याप्रमाणें एकादशस्कंधांतहीं ह्मटलें आहे:—

“ भक्तिः परेशानुभवो विरक्ति रन्यत्र चैतत्त्रि कएक-कालम् । प्रपद्यमानस्य यथाश्नतः स्यु स्तुष्टिश्च पुष्टिः क्षुदपायोगः ॥ १ ॥ इत्यच्युतांघ्रिं भजता नु वृत्त्या भक्तिर्विरक्तिर्भगवत्प्रबोधः । भवन्ति वै-भागवतस्य राजँस्ततः परां शान्तिमुपैति साक्षात् ॥ ”

“ जेवावयास बसलेल्या मनुष्यास ज्याप्रमाणें प्रत्येक घांसाचे ठिकाणीं सुख, क्षुधानिवृत्ति व उदरपोषण हीं प्राप्त होतात त्याप्रमाणेंच भगवद्भक्ताचेठायीं प्रेमास आश्र-

यभूत असणारी परमेश्वरस्वरूपाची स्फूर्ति आणि वैराग्य हीं एकसमयावच्छेदेंकरून उत्पन्न होतात. निरिच्छ मनानें जे ईशचरणाची सेवा करतात त्यानांच प्रथम ही स्वरूप-स्फूर्ति आणि विरक्ति प्राप्त होते. आणि परमशांतिरूप जी स्थिति आहे ती तदनंतर मिळणारी आहे ”

अशाप्रकारें ज्याप्रमाणें भोजन मिळालें असतां तृप्ति ही लागलीच होते त्याप्रमाणेंच भगवद्भजनानें अंतर्यामीं प्रेम-वृद्धि होऊन मोक्षमार्ग आपोआपच लागोपाठ खुला होतो, आणि ह्मणूनच भक्तांस ब्रह्मनिष्ठांपेक्षा वरिष्ठ ह्मणावयाचें. भगवद्भक्ति जडणें खरोखर पूर्वसुकृतावर अवलंबून आहे. राजा परिक्षित् ह्मणतोः—

“ देवानां शुद्धसत्वानां ऋषीणां चामलात्मनाम् ।
भक्तिर्मुकुन्द चरणे प्रायेणैवोपजायते ॥ १ ॥
“ रजोभिः सहसंख्याताः पार्थिवैरिह जंतवः ।
तेषां येकेचने हन्ते श्रेयो वै मनुजादयः ।
“ प्रायोमुमुक्षवस्तेषां केचनैव द्विजोत्तम ।
मुमुक्षूणां सहस्रेषु कश्चिन्मुच्येत सिध्यति ॥ ३ ॥
“ मुक्तानामपि सिद्धानां नारायणपरायणः ।
सुदुर्लभः प्रशान्तात्मा कोटिष्वपिमहामुने ॥ ४ ॥ ”

“ शुद्ध, सत्वगुण ज्यांचे अंगीं आहेत अशा देवादि-कांची किंवा स्वच्छ अंतःकरणाच्या ऋषींची देखील भगव-च्चरणीं प्रीति जडतांना मोठी पंचाईत पडते मग मानवांचीती कथा काय? या पृथ्वीतलावर धुळीच्या कणां इतके मनु-ष्यप्राणी आहेत पण त्यांपैकीं थोडीच मनुष्यें धर्माचरण

करणारीं असतात. आणि या धर्माचरणीं लोकांत मुमुक्षु असे थोडेच निघतात; व या मुमुक्षुंमध्यें गृहदारादिकांचा मोह सोडून खरें तत्वज्ञान जाणणारे तर बोटावर मोजण्या इतकेच निघावयाचे. पुन्हां शातात्मे भगवत्परायण लोक ह्या तत्वज्ञान्यांमधून निघावयाचे असल्याकारणानें ते असे किती सांपडणार? कोटीमध्यें एक अशा प्रमाणानें ते सांपडले तर न जाणो! ह्मणून नारायणाचे ठिकाणीं लक्ष ठेवणारे जे भक्तिमान् आहेत ते ज्ञान्यापेक्षांही श्रेष्ट ह्मटले पाहिजेत.

---

## प्रकरण तेरावें.

# भक्ति व मुक्ति.

भक्तिमुक्त्यो र्न भेदोस्ति स्वसुखं वै तयोः फलम् ।
इति चेदस्ति भेदोल्प ईशे प्रीति र्न निर्गुणे ॥ १७॥

**भक्ति** ह्मणजे भगवन्निष्ठांतःकरणवृत्ति आणि **मुक्ति** ह्मणजे ब्रह्माकार वृत्ति या दोन्ही ईशब्रह्माकार वृत्तींपासून प्राप्त होणारें फल काय तर **आत्मसुख** हें होय. आतां ईशस्वरूप आणि ब्रह्मस्वरूप हीं दोन्हींही सर्वात्मक व एकरूप अशींच असल्याकारणानें त्या दोघांपासून प्राप्त होणाऱ्या सुखांत फरक तो कोणता? खरें आहे. पण त्यांच्या स्वरूपांत जरी भेद नाहीं तरी एक मनोवृत्ति हा मुख्य विषय असल्याकारणानें त्याच्यामध्यें थोडासा भेद उत्पन्न होतो. उपासकांना या भेदाची प्रतिती येते. ती कशी ह्मणाल

तर त्यांची भगवच्चरणीं प्रीति असते. कृष्णादि सुंदर सगुण ब्रह्मस्वरूप सच्चिदानंद मूर्तीवर भक्तांचें जसें एक प्रकारचें अनुपम्य प्रेम असतें तसें मायासंबंधशून्य शुद्ध अशा ब्रह्मस्वरूपावर ब्रह्मनिष्ठाचें प्रेम कसें जडणार? कारण ते मुळीं मनोवृत्तिविषयक नाहींतच; आणि प्रीति जडण्यास मनोवृत्तीचा आश्रय तर अवश्य पाहिजे. आतां ब्रह्म मनोवृत्तिविषयक नाहीं ह्मणून ब्रह्मसाक्षात्कारही कधीं व्हावयाचा नाहीं असें ह्मणाल तर मात्र तें ह्मणणें चुकीचें आहे. ब्रह्मसाक्षात्कार, मनोवृत्ति ब्रह्माचे ठायीं लीन झाल्याबरोबर एकदां होतो. योगाभ्यासानें चित्त-निरोध होऊन त्याची व आत्म्याची गांठ पडल्याबरोबर तें तेथें रममाण होतें. हाच साक्षात्कार व हाच मोक्ष. ह्या अवस्थेंत ध्येय, ध्यातृ या अद्वैत चिंतेचा समूळ नाश होऊन चित्त अक्षय्य अशा ब्रह्मानंदांत पूर्णपणें निमग्न झालेलें असतें. त्यांस ही स्थिति प्राप्त होण्याचे पूर्वीच साक्षात्कार प्राप्त झालेला असतो. तदनंतर मग कांहीं नाहीं. भगव-द्भक्तांची गोष्ट अशी नाहीं त्याना हें मोक्षसुख पाहिजे तेव्हां मिळून हरिभजनापासून मिळणाऱ्या अनुपम्य सुखा-चाही आस्वाद घेतां येतो. ब्रह्मनिष्ठाचें मन एकदां आत्म-संस्थ झालें ह्मणजे मग ते कोणताही व्यापार जाणत नाहींत. आत्मचिंता अगर अनात्मचिंता दोन्हींतून एकही ते जा-णत नाहींत; कारण आत्मचिंता केल्यास ती संप्रज्ञात समाधि होईल. व अनात्मचिंता केल्यास समाधि विसर्जन होईल. ह्मणून कोणत्याही प्रकारचा व्याप मागें न ठेवतां मन आत्म्याचेठायीं लीन करावें ह्मणजे तें नि-रोध समाधियुक्त होतें. या असल्या प्रकारच्या असं-

प्रज्ञात समाधिमध्यें मनोवृत्ति स्थिर झाली असल्याकारणानें ज्ञाना लोकांना निर्विकार ब्रह्माचे ठायीं प्रीति ठेवतां येते. कारण सेव्यसेवक भाव मुळींच तेथें उरलेला नसतो. परंतु भगवद्भक्त जे आहेत त्याना भगवद्गुणवर्णन ध्यानादिकांच्या योगेंकरून अतिशय सुख प्राप्त होऊन हरिचरणीं त्यांची निस्सीम प्रीति जडते. ती इतकी कीं, षड्गुणैश्वर्य देखील निजपुढें त्यांना तुच्छसें वाटूं लागतें भगवत्प्रेमाचा लय होईल या भीतीनें मोक्षाचीही ते इच्छा करीत नाहींत. फार तर वैकुंठवासी नारायणासंनिध राहण्याचें ते कबूल करतात. आतां वैकुंठ तरी मृत्युलोकाप्रमाणेंच एक विशिष्ट लोक असल्यामुळें या भगवद्भक्तांना कालचक्राच्या फेऱ्यांत सांपडावें लागत असेल; अशी कल्पना जर कोणी काढील तर ती व्यर्थ होय. भगवान् ह्मणतातः—

“ न कर्हिं चिन्मत्पराः शांतरूपेनङ्क्ष्यन्तिनोमेऽनिमीषोलेढिहेतिः । एषामहं प्रिय आत्मा सुतश्च सखा गुरुःसुहृदो दैवाभिष्टम् ॥ १ ॥ ”

वैकुंठवासी भक्तजनांच्या सुखांत कधींही व्यत्यय येत नाहीं. पुत्र, सखा, गुरु, सुहृत्, इष्टदैवत वगैरे अनेक प्रकारच्या नात्यांनीं वागणारा त्यांचा पाठिराखा तेथें समर्थ असतांना त्यांना कालचक्रापासून भीती असणें संभवेल तरी कसें? सारांश. सगुणोपासना किंवा निर्गुणोपासना यांच्यापासून प्राप्त होणाऱ्या सुखांत जरी कांहीं भेद नाहीं तरी सगुणोपासनेपासून भगवत्प्रेम कायम ठेवतां येतें.

**स्त्री भोगसुखसाम्येऽपि रमण्यां प्रेम जायते ।**
**तथात्म सुखसाम्येपि सगुणे प्रेम जायते ॥ ११८ ॥**

वरील एकंदर विवेचनावरून कोणी ह्मणेल कीं, " जेथें सुख आहे तेथें प्रेम असलेंच पाहिजे. सुख व प्रेम यांत भिन्नभाव तो काय आहे? " एक प्रकारें खरें आहे. पण हा विचार तर्कज्ञानाच्या कसोटीस उतरावयाचा नाहीं. एकादें पक्कान्न कोठें, आणि कसेंही खाल्लें तरी त्याची गोडी सारखीच असते हें खरें; पण तेंच भोंवतालीं नानातऱ्हेच्या चित्राविचित्र रंगावली काढल्या आहेत, अगरबत्या व उद-बत्यांचा घमघमाट सुटला आहे, अंगास सुवासिक केश-राची उटी मर्दन केली आहे, अशा थाटांत एकादें सुंदर रुप्याचे ताट ठेवून त्यांत चटण्या कोशिंबीरीचे मध्यभागीं सवर्ण रत्नालंकारमंडीत गौर करांबुजानें आणून ओदन वाढिलें तर त्याच्या सेवनापासून जें सुख आणि जो आनंद उत्पन्न होईल तसें सुख आणि तसा आनंद तेंच पक्कान्न एखाद्या अशौच व भयाण स्थलीं हातांत घेऊन पिशाचवत् सेवन करण्यांत आहे काय? स्त्री-भोग-सुख, स्त्री कसल्याही प्रकारची असली तरी सारखेंच मिळणार हें खरें आहे. पण जिचें मुखकमल चंद्राप्रमाणें सुंदर व सुप्रसन्न आहे, कंठ कोकिले प्रमाणें मधुर, कानास आल्हाद देणारा असा आहे, नेत्रांचे ठायीं एक प्रकारचें विशेष पाणी खेळत असून जी वस्त्राभरणांनीं अगदीं खचून गेली आहे, अशा नवयौवनसंपन्न गजगती स्त्रीकडे पाहून पुरुषांच्या चित्त-वृत्ति अगदीं तल्लीन होण्याचें कारण काय?

त्याचप्रमाणें आत्मसुख जरी येथून तेथून सारखेंच आहे तरी सगुण षड्गुणैश्वर्य संपन्न भगवान् वासुदेवाचे गुणश्रवण, कीर्तन, ध्यान इत्यादिकांचे योगेंकरून त्याचे-ठायीं विशेष प्रेम उत्पन्न होतें. वस्तुतः स्त्री-भोग-सुख

जरी सारखेंच असतें तरी सुंदर स्त्रीचे ठायीं कामुक जनांची जशी विशेष आसक्ति दिसून येते तद्वतच भगवद्गुण श्रवणमार्गे करून भक्तजनांचें अंतःकरण आर्द्र होऊन त्यांचे नेत्रांतून प्रेमाश्रूंचे प्रवाह लोटतात. आणि सर्वगात्रें रोमांचानी भरारून जातात. यासाठींच प्रल्हाद ईशचरणीं प्रार्थना करितो—

" या प्रीतिरविवेकानां त्वदयेष्वनुयायिनी ।
त्वामनुस्मरतःसा मे त्हृदयान्मापसर्पतु ॥ १ ॥ "

ह्मणून ब्रह्म मनोवृत्तिविषयक नसल्यामुळें भगवद्गुणश्रवणानें, त्या सगुण ब्रह्म, मनोहर श्रीकृष्ण परमात्म्यावर ज्या प्रमाणें प्रेम जडतें तसल्या प्रेमाचा अनुभव ब्रह्मनिष्ठांना मिळत नाहीं. तो एक भक्तजनानांच मिळूं शकतो. यावरून प्रेम व सुख यांत अंतर असून, भक्तिची बरोबरी मोक्षांत नाहीं हें निर्विवाद सिद्ध होतें.

ईशस्य भजनं मुख्यं ज्ञानिनामात्म चिन्तनम् ।
तस्य विक्षेपकं बाह्यं कीर्तनश्रवणादिकम् ॥ ११९ ॥
इति चेत्सममेवंतत्समाधौ ज्ञानि भक्तयोः ।
विक्षेपकं न तूत्थाने किं नेशः सेव्यते विदा ॥ १२० ॥

" सुख व प्रेम यांमध्यें अंतर असेल तर असो. ज्ञानी लोकांना त्यांशीं काय करावयाचें आहे ? कीर्तन श्रवणादिकां पासून तर, ते सर्व बाह्य व्यापार असल्याकारणानें त्यांचा चित्तविक्षेप व्हावयाचा " शमदमादि साधन संपन्न लोकांचें भगवत्पूजन ह्मणजे आत्मचिंतन हेंच होय. " तत्त्वमसि " वगैरे महावाक्यांवर शांत मनानें

विचार करून समाधीचे ठायीं जीव व आत्मा यांचें एकरूपत्वानें चिंतन करणें हेंच त्यांचें मुख्य ईश्वर भजन ह्मणावयाचें. श्रवण, कीर्तन, पूजन, अभिवंदन हे सर्व बाह्य व्यापार होत, त्यांच्या योगानें तर त्यांच्या आत्मचिंतनांत उलट विक्षेप यावयाचा; कारण ते श्रवणादि सर्व प्रकार चित्तैकाग्रतेस अगदीं विरोधी असे आहेत. अंतर्मुख अशा योगी लोकांना मायीक व सगुण अशा ईश्वराचे गुणश्रवण करून काय करावयाचें आहे? शंका तर जबरदस्त आणि कांहीं सयुक्तिकही पण आहे. आतां ती कितपत कसोटीस उतरते हेंच पहावयाचें आहे.

वरील शंकेंतील मुख्य मुद्दा हा आहे कीं, श्रवणादिक बाह्य व्यापाराच्या योगानें योग्याच्या आत्मचिंतनांत व्यत्यय येतो. आता हा व्यत्यय येतो ह्मणावें तर भगवद्भक्तांच्या मनोवृत्ति परमानंदाच्याठायीं लीन झालेल्या असतां त्यांची जी समाधि लागते त्या समाधीमध्येंही श्रवणादि बाह्य व्यापारांनीं विक्षेप आला पाहिजे. पण तसें होत नाहीं; असा अनुभव आहे. यावरून असें ह्मणावें लागतें कीं, समाधिसुखांत बाह्य व्यापारांपासून व्यत्यय येऊं शकत नाही. आतां यावर देखील अशी शंका निघण्याचा संभव आहे कीं, ज्ञानी लोकांची आत्मसुख चिंतनांत समाधि लागते हें ठीकच आहे, पण सगुण ईश्वराचें भजन करणाऱ्या भक्तजनांना ती समाधि कोठची? या शंकेचें श्रीनारदमुनीनीं स्वानुभवावरूनच समाधान केलें आहेः-

"ध्यायत श्चरणाम्भोजं भावनिर्जित चेतसा।
औत्कण्ठाश्रु कलाक्षस्य हृद्यासीन्मे शनैर्हरिः॥ १॥

"प्रेमाति भरनिर्भिन्नपुलकाङ्गोऽति निर्वृतः ।
आनन्दसंप्लवे लीनो नापश्यमुभयं मुने ॥ २ ॥"

ते ह्मणतात "सर्व चित्तवृत्ति आकलन करून एकभावेंकरून जेव्हां मी श्रीवैकुंठाधिपतीच्या चरणकमलांचें ध्यान करावयास लागलों तेव्हां हे महामुने ! श्रीहरींनीं माझे हृदयसंपुटांत प्रवेश केला ! त्यावेळची माझी स्थिती काय सांगूं ! माझे नेत्रद्वय आनंदाश्रूंनीं भरून आले. सर्वांगावर रोमांच थरारून आनंदसमुद्रांत जणूं काय मी बुडून गेलों आहे असें मला वाटावयास लागलें. ध्येयध्यानादि किंवा श्रवणादि अंतर्बाह्य व्यापारांची मला ओळखच राहिली नाहीं ! ! !

एवंच काय तर श्रवणादि बाह्य व्यापारांपासून ज्ञानी जनास किंवा भक्त जनांसही त्यांच्या समाधिसुखांत व्यत्यय येत नाहीं. असें आहे तर सूज्ञ लोकांनीं त्या सर्वनियंत्या परमेश्वराचे गुणश्रवण, पूजन, अर्चन वगैरे अवश्यमेव करावें.

---

## प्रकरण चवदावें

# भगवत्पूजन कां करावें ?

शारीराः स्नानपानाद्यास्त्यज्यन्ते किं क्रियाविदा ।
संस्कारात्ताः क्रियन्तेचेदी शोपास्तिस्तथा न किम् ॥ १ ॥

भगवद्भजनापासून समाधीमध्यें विक्षेप येऊं शकत नाहीं. आणि ईशचरणीं भक्ति जडली असतां त्यांत एक-

प्रकारचें विशेष सुख आहे कीं, जें मोक्षप्राप्तींतही नाहीं, हें मागील प्रकरणांत सिद्ध झालेंच आहे. या सर्व गोष्टी-वरून निष्पन्न काय होतें, तर सर्वत्रांनीं भगवत्पूजनादि ईशसेवेच्या मार्गाचें अवलंबन करावें. आतां ज्ञानी अशा ब्रह्मनिष्ठ लोकांना आत्मचिंतनावांचून, बाह्य असें कोण-तेंही कर्माचरण करणें आवडत नाहीं, असें ह्मणावें तर स्नानपानादि बाह्य क्रियांचा त्यांनीं त्याग केला आहे काय? “ नाहीं. पण त्या केवळ संसारजन्य असल्या वरून त्यांचे हातन होतात. पूर्वसंस्कारवशांत अनायासें करू-नच जर त्या त्यांच्याकडून होत असल्या तर त्यानीं तरी त्यास काय करावें?’ ठीक आहे; पण मग भगवदुपासनाही या स्नानपानादि क्रियांप्रमाणेंच करण्यास कोणची अडचण आहे? त्यांत त्याचें कोणत्याही प्रकारचें अनहीत नाहीं, किंवा त्यांच्या आत्मचिंतनांत त्यापासून विक्षेपही येऊं शकत नाहीं. उलट ज्ञानप्राप्तीस ईश्वरोपासनेची अत्यंत अव-श्यकता आहे ह्मणून ज्ञानप्राप्तीची इच्छा करणारांनीं तिचा त्याग करणें कधींही योग्य होणार नाहीं. आतां ज्ञानी लोक तरी तसें आचरण करतात कीं काय हें पाहूं.

**ज्ञानिनापीश्वरः सेव्यो यावज्जीवं हि पूर्ववत् ।**
**अन्यथासौ कृतघ्नः स्यात्सेवने तु कृतज्ञता ॥ १२२ ॥**

ज्ञानेच्छु लोकांनीं ईशसेवा तर करावीच, पण ज्यास आत्मसाक्षात्कार झाला आहे अशा ज्ञानी ब्रह्मनिष्ठांनींही ती केली पाहिजे. ज्ञान प्राप्त होण्याचे पूर्वी ज्या प्रमाणें ते परमेश्वराचें पूजाभिवंदनादि अनेक प्रकारांनीं आराधन करीत असत तोच क्रम ज्ञानप्राप्ती नंतरही यावज्जन्म

त्यांनीं चालवावा हा योग्य मार्ग होय. नाहीं तर कृतघ्न- तेचा आरोप त्यांच्यावर यावयाचा. या कांहीं सांगोपांगी- च्या गोष्टी नाहींत. यांस प्रत्यक्ष प्रमाण आहे:—

' यावज्जीवं त्रयःसेव्या वेदान्तो गुरुरीश्वरः '

केलेला उपकार पुन्हा न जाणणें यास कृतघ्नता कोण ह्मण- णार नाहीं? ज्ञानप्राप्तीनंतरही ईश्वराराधनेचा तसाच क्रम चालविणें ही मात्र कृतज्ञता होय. वस्तुतः त्या करु- णात्मकावर प्रत्युपकार करण्यास कोणीच समर्थ नाहीं ही गोष्ट निर्विवाद आहे. उद्धव श्रीकृष्णाप्रत ह्मणतातः—

" तं त्वाऽखिलात्मदयितेश्वरमाश्रितानां, सर्वार्थद- स्वकृतविद्विसृजेतकोनु । कोवा भजेत् किमपि विस्मृ- तये न भूत्यै किंवा भवेन्नतवपादरजो जुषांनः ॥१॥

नैवोपयत्यपचितिं कवयस्तवेश, ब्रह्मायुषापिकृत- मृद्धमुदःस्मरन्तः ॥ योऽन्तर्बहि स्तनुभृतामशुभंवि- धुन्वन्नाचार्य चैत्य वपुषा स्वगतिं व्यनक्ति ॥ २ ॥ "

" हे सर्व जगतास चेतना देणाऱ्या प्रभो ! हे आश्रितज- नांचे अभिष्टदात्या! प्रियतमा वासुदेवा! त्वां आह्मां दीन जनाचे रक्षणार्थ केलेलीं अद्भुत कृत्यें सर्व पूर्णपणें अवगत असतांना तुझा अव्हेर कोण करूं शकणार आहे काय? या मायामय संसाराची विस्मृति पडण्यास तुझ्या व्यतिरिक्त दुसऱ्या कोणत्या देवाची आराधना करून काय मागणार आहे? आह्मा तुझ्या चरणरजांचे सेवकांनां जर धर्मादिक साधनावाचूनच पाहिजे तें प्राप्त होत आहे तर मग आह्मी

दुसऱ्या साधनांची गरज ती काय ह्मणून ठेवावी? हे ईश्वरा तूं बाहेरून रूपानें व अंतर्यामी आत्म्याचे रूपानें आमच्या मनोवासनांचा नाश करून आपले स्वरूपाचा प्रकाश आमचे हृष्टोत्पत्तीस आणतोस. अतएव ब्रह्मरूप झालेल्या ब्रह्मवेत्त्यांनाही तुझे ऋणांतून मुक्त होतां येत नाहीं. तू केलेल्या उपकारांच्या स्मरणातच त्यांनां पूर्ण समाधान मानावें लागतें." ह्मणून त्या परमोपकारी ईश्वराची मनःपूर्वक सेवा न करणारा पुरुष, मग तो मोठा ब्रह्मज्ञानी कां असेना कृतघ्नच ह्मटला पाहिजे. ज्ञान प्राप्त्यर्थ प्रथमतः भगवदाराधना करावी, आणि इष्ट हेतु सफळ झाल्यावर, "मी मुक्त झालों, मी ज्ञानी झालों" असल्या प्रकारच्या असदभिमानांत गर्क होऊन त्यास समूळ विसरून जावें, हा कांहीं योग्य मार्ग नव्हे. आपला मनोरथ पूर्ण झाल्यावरही जो मागील अनुग्रह स्मरून ईशसेवेंत पूर्ववत्प्रमाणेंच दक्ष रहातो तोच खरा भक्तोत्तम, असें ह्मटलें पाहिजे.

ननु जीवस्य चेशस्याप्यनित्यं मायिकं वपुः ।
नातस्तयोर्विशेषोऽस्ति किमीशसेवयेतिचेत् ॥ १२३ ॥
करकाणां यथामन्दलवणस्य च सर्वथा ।
जलजत्वाविशेषेण विशेषो धर्मतो महान् ॥ १२४ ॥
करका मधुराःस्वच्छा द्रवन्ति शीतलाःस्वयम् ।
तृट्शामिका मनुष्याणां लवणं तद्विलक्षणम् ॥ १२५ ॥
तथातयोर्विशेषोऽस्तिविद्याविद्याऽशरीरिणोः ।
विद्ययेशो नित्यमुक्तो जीवो बद्धस्त्वविद्यया ॥ १२६ ॥

ब्रह्मांडाभिमानी कृष्णाचें शरीर आणि देहाभिमानी

जीवाचें शरीर हीं दोन्ही ही मायानिर्मित ह्मणजे अर्थात् अनित्य अशीं असल्या कारणानें जीव आणि तो परमेश्वर यांमध्यें फारसें अंतर आहे असें ह्मणतां येत नाहीं. दोहों-नाही स्वरूप व उपाधि आहेतच मग त्यांजमध्यें भेद तो कोठें राहिला? आणि भगवत्पूजन करण्याचें कारण तें काय? जीव व परमेश्वर यांचे स्वरूपांत भेद नसल्यामुळें त्यांचेमध्यें सेव्यसेवकभाव नसावा, हें कोणीही शहाणा मनुष्य कबूल करील. उपाधियुक्त परमेश्वराची उपाधियुक्त पुरुषानें केलेली सेवाही मायामयच होणार. गुळाचा गणपती व त्यास गुळाचाच नैवेद्य!"

शंका तर प्रथमदर्शनी मोठी जबरदस्त आहे. तिचा विचार स्वस्थ व सयुक्तिकपणें झाला पाहिजे, नाहीं तर "मूले कुठारः" या न्यायानें आपली **भक्तिकल्पलता** एकदम मुळापासून उन्मळून पडावयाची! असो. प्रथम उदाहरणार्थ आपण एक बर्फ व मीठ यांचा दृष्टांत घेऊं. हे दोन्ही पदार्थ पाण्यापासून उत्पन्न झालेले असतात. पण तेच यांजमधील परस्पर धर्म पाहिले असतां ते किती तरी भिन्न दिसून येतात. बर्फ मधुर असतें आणि मीठ खारट असतें. बर्फाचा व भूमीचा मुळींच संयोग होत नसल्यामुळें तें कसें निर्मळ, शुद्ध, शुभ्र आणि वर्तुलाकार असें असतें. त्याजकडे नुसतें पाहूनच मनास आल्हाद उत्पन्न होतो. पण इकडे मीठ जमिनीच्या संयोगानें काळें व खरबरीत असें झालेलें असतें. बर्फ सेवन केलें असतां दाह होत असल्यास त्याचें शमन होऊन अगदीं गारीगार वाटतें. तेंच मीठ भाजीपाल्यांत जर थोडें जास्त झालें तर दिवसभर शोष पडून पाणी पाणी असें होऊन जातें. बर्फ जें आहे

तें आपोआप द्रवत्व पावून पाण्यांत मिसळून जातें. मिठाची गोष्ट तशी नाहीं. जमीनीवर पडल्या बरोबर बर्फाचा तुकडा विरघळून जातो पण मीठ उलट काठिण्य पावतें. सारांश, बर्फ व मीठ हे दोन्ही पदार्थ जरी पाण्यापासूनच उत्पन्न झालेले आहेत तरी त्यांमध्यें परस्परास अगदीं विरुद्ध असे गुणधर्म आहेत. त्याचप्रमाणें ईश व जीव यांचीं शरीरें जरी मायानिर्मित आहेत तरी त्यांजमध्यें जमीनअस्मानाचें अंतर आहे. पहिलें विद्येचे योगेंकरून शुद्धसत्वात्मक असें असतें व दुसरें अविद्येमुळें मलिनसत्व असें झालेलें असतें. परमेश्वर नित्यमुक्त असाच नेहमीं आहे. कारण, "ब्रह्मैवाहं" या पूर्ण ज्ञानाच्या योगेंकरून त्याचा देह जरी मायामय असला तरी तो उज्वल राहूं शकतो. जीव मायेनें व्यापिलेले असतातच पण त्यांवरही अविद्येचें जाड आवरण असतें. परमेश्वरस्वरूप ह्मणजे एकाद्या रत्नकुंभांत ठेविलेल्या दीपाप्रमाणें होय आणि जीवस्वरूप केवळ मृत्कुभांत ठेविलेल्या दीपाप्रमाणें होय. विष्णुस्वामी ह्मणतातः—

"ल्हादिन्यासं विदाश्लिष्टः सच्चिदानन्द ईश्वरः ।
स्वाविद्या संवृतो जीवः संक्लेश निकराकरः ॥१॥"

तर बर्फ आणि मीठ यांचेमध्यें जितकें साम्य आहे तितकेंच जीव आणि परमेश्वर यांजमध्यें आहे असें ह्मणावें लागतें.

**लावणाब्धिर्विशुद्धात्मा शान्तो मुक्तः स्वयंप्रभुः ।**
**भवतृड् शामकः स्वानां जीवस्तस्माद्विलक्षणः ।१२७।**

परमेश्वर केवळ लावण्याचा समुद्रच आहे आणि जीव

कर्मबद्ध असल्यामुळें मनुष्यतिर्यगादि निकृष्टस्वरूप धारण करणारा असा असतो. परमेश्वर विशुद्धात्मा ह्मणजे रजस्तमजन्य कामक्रोधादि वृत्तिरूप मलरहित शुद्धसत्वविशिष्ट असा आहे. जीवांचा हा कामक्रोधादि वृत्तिरूप मल झडलेला नसतो ह्मणून अनेक वासनांनीं त्यांचें मन अशुद्ध असेंच रहातें. त्याचप्रमाणें परमेश्वर ब्रह्मनिष्ठांचे सर्व धर्म निसर्गतः त्याचे अंगीं वास करीत असल्याकारणानें, नित्य मुक्त व शांत असा आहे. आणि जीव 'मी कर्त्ता, मी भोक्ता' या असदभिमानरूप अज्ञानरज्जूंनीं बद्ध झाला असल्यामुळें तो स्वतः मुक्त असा नसतो. सत्कर्मपरिपाकवशात् गुरूपदेश प्राप्त होउन त्याची सुटका होईल तेव्हांच काय तो मुक्त व्हावयाचा. पुन्हा दुष्टांचा संहार करून शरणांगताचें रक्षण करण्याचें आणि, "अमुक माझें, तमुक माझें, पुत्र माझा, स्त्री माझी" या भवतृष्णेचें शमन करण्याचें सामर्थ्य अंगीं असल्याकारणानें ईश्वर पूर्ण स्वतंत्र असा आहे. परंतु जीवानां हें सामर्थ्य नसल्यामुळें त्यांचें सर्व जीवित अगदीं पराधीन असतें. ह्मणजे जीव व तो सर्वशक्तिमान् परमेश्वर यांजमध्यें कांहीं तरी साम्य आहे काय? परमेश्वराच्या गुणांचा सहस्त्रांश ही त्याचे अंगीं नसतो. उगाच, परमेश्वर व जीव यांचे देह फक्त मायानिर्मित आहेत एवढ्यावरूनच त्यांजमध्यें मुळीं भेदच नाहीं असें ह्मणणें ह्मणजे केवळ मूर्खपणा नव्हे काय? केवळ शैत्याचे योगानें बनलेलें बर्फ जसें दिसण्यात पाण्याहून भिन्नसें दिसतें, पण खरें पाहतां तें शुद्ध पाणीच असतें, त्याप्रमाणेंच परमेश्वरानें जरी आपल्या मायेच्यायोगेंकरून प्रसंगवशात् विशिष्ट आकृति

धारण केलेली असते तरी खरें पाहतां तो शुद्ध, निर्गुण ब्रह्मस्वरूप असाच असतो. त्याचा जीव किंवा शरीर उत्पन्न होत नाहीं किंवा नाशही पण पावत नाहीं. भगवान् अर्जुनाप्रत सांगतातः—

बहूनि मे व्यतीतानि जन्मानि तव चार्जुन ।
तान्यहं वेद सर्वाणि न त्वं वेत्थ परन्तप ॥ १ ॥
अजोऽपि सन्न व्ययात्मा भूतानामीश्वरोऽपिसन् ।
प्रकृतिं स्वामधिष्ठाय संभवाम्या त्ममायया ॥ २ ॥"

" पार्था तुझे व माझे जन्म बहुत होऊन गेले आहेत. त्यांची स्मृति नसल्यामुळें तुला ते समजत नाहीत; पण मला त्या त्या सर्व अवतारांची स्मृति आहे. मी अज ह्मणजे जन्मरहित असा आहे, तरी मायेच्या योगानें मला अवतार घेऊन भूतलावर अवतीर्ण व्हावें लागतें. त्याच्यामुळें माझ्या अविनाशतेस किंवा स्वतंत्रतेस बाध मुळींच येत नाहीं."

यापेक्षा आणखी प्रमाण तें काय पाहिजे? परमेश्वरांनीं अवतार धारण केला किंवा विसर्जन केला असें जें आपणांस वाटतें तो भास केवळ त्याच्या मायेचाच परिणाम होय. परमेश्वरस्वरूप जीवाप्रमाणेंच मायानिर्मित असें असल्यामुळें तो कर्माधीन आहे अशी आपली खोटी समजूत होते. याचें कारणही आपण त्याजकडे अज्ञानबुद्धीनें पाहतों हेंच होय. एकाचेंच दुसरें प्रतिबिंब दिसतें, तें आरशामुळें दिसतें. बाकी सारासारविचारानें पाहिलें तर ती वस्तु दुसरी का असते? त्याचप्रमाणें पर-

मेश्वर हा निराकारच आहे पण कार्यासाठीं त्याला मायेस वश होऊन नटासारखें नटावें लागतें.

**स्वतन्त्रोपीश्वरो देहं धृतवान्केन हेतुना ।**
**धर्मसंस्थापनार्थाय स्वजनप्रेमवृद्धये ॥ १२८ ॥**
**यथेन्धनाश्रितो वन्हि र्याज्ञिकैः समुपासितः ।**
**ददात्यसौ फलं तेभ्यस्तथा मायाश्रितो हरिः ।१२९।**

" बरें परमानंदानें ईश्वर जर सदा संतुष्ट आणि स्वतंत्र असा आहे तर देह धारण करण्याचें त्यास एवढें कोणतें प्रयोजन आहे! कारणा वांचून तर या जगांत एकही गोष्ट होत नाहीं" अशी पृच्छा कोणी साहजीक करील तर त्यास उत्तर असें आहे कीं, परमेश्वरास वारंवार जे अवतार धारण करावे लागतात त्याचें कारण अधर्माचा नाश करून वेदोक्त सनातन धर्मानें रक्षण व्हावें; आणि आपणांस अनन्यभावानें शरण आलेल्या लोकांची प्रेमवृद्धि व्हावी. गीतेंत ह्मटलें आहेः—

**परित्राणाय साधूनां विनाशायच दुष्कृताम ।**
**धर्मसंस्थापनार्थाय संभवामि युगे युगे ॥ १ ॥**

ईश्वरानें मायेच्या आश्रयेंकरून देह धारण केला नाही तर जगांत सन्मार्ग प्रवृत्ति व्हावयाची नाहीं. अग्नि अमूर्तरूपानें सर्वत्र आहे पण श्रौतस्मार्त विधिपूर्वक त्याची आराधना केल्यावर तो जेव्हां इंधनाचे आश्रयानें मूर्तमान प्रगट होतो तेव्हांच याज्ञिक लोकांचे अभिष्ट हेतु सफल होतात. त्याच प्रमाणें आपले मायेचे योगंकरून श्रीरामकृष्णादि अनेक अवतारांनीं आविर्भूत झालेल्या

परमेश्वराची ध्यान-पूजनमात्रेंकरून आराधना केली तरच आपले हेतु पूर्ण होऊन मोक्षादि फलप्राप्ति होईल. श्रीमद्भागवतांत श्री शंकर ह्मणतातः—

" क्रियाकलापैरिदमेव योगिनः श्रद्धान्विताःसाधु यजन्ति सिद्धये। भूतेन्द्रियान्तःकरणोपलक्षितं वेदेच तन्त्रेच त एव कोविदाः ॥ १ ॥ "

ईश्वर स्वरूपानें जरी केवळ ब्रह्मरूप असा आहे तरी त्याच्या साकाररूपाचीच जे सेवा करतात तेच खरें वेदांतील तत्व जाणणारे. सगुण स्वरूपाचा अव्हेर करून केवळ ज्ञानमार्गाचा अवलंब करणारांना त्यांतील मख्खी समजलीच नाहीं असें ह्मणावें लागते. अग्नि सर्वत्र आहे ह्मणून त्याची नुसती आराधना करून त्यास हविर्भाग अर्पण केला तर त्या पासून जसें कांही फल प्राप्तव्हावयाचें नाहीं, तद्वतच निर्गुण स्वरूपाचें अधिष्ठान जरी सर्वत्र आहे तरी तो आपणां मायामोहीत जीवांना अगोचर असल्या कारणानें त्याची साक्षात् उपासना आपले हातुन न होतां सर्व श्रम मात्र निष्फल होतात तो सर्वाश्रित अग्नि इंधनाचे आश्रयानें जेव्हां प्रदिप्त होतो तेव्हां तो अर्पण केलेल्या हविर्भागाचा स्वीकार करून यजमानाचे मनोरथ पूर्ण करितो. त्याचप्रमाणें रामकृष्णादि अवतार धारण करून प्रगट झालेल्या परमेश्वरास कायावाचामनेंकरून आपलें सर्वस्व अर्पण केलें तर तो त्याचा अंगिकार करतो आणि त्याचा मोबदला ह्मणून पाहिजे तें देण्यास कसूर करीत नाहीं. आपल्या सर्वत्र तेजानें प्रदीप्त झालेल्या अग्नीस अर्पण केलेली समिधा जशी तात्काल अग्निरूप होऊन

जाते तद्वतच त्या अवताररूपानें प्रगट झालेल्या सर्व शक्तिमान् परमेश्वरास आपला अविद्यात्मक पूर्व स्वभावाअर्पण केला असतां आपण त्या अग्निरूप झालेल्या समीधेप्रमाणें तदाकार होऊन जातों. जीवाची मुक्ति ती हीच. तर शुद्धसत्व असा देह धारणकरणाऱ्या प्रभूची सेवा अवश्य करावी त्यापासून ईशप्रसाद प्राप्त होऊन स्वरूपसाक्षात्कारही लवकर होतो.

**अतीन्द्रिय त्वतो नोचेदुपास्यो निर्गुणोविभुः ।**
**सगुणोऽप्येकदेशीशःकृष्णः स्यादिति चे च्छुणु ।१३०**
**सगुणोऽपि विभुःकृष्णो ह्यव्यक्तस्तस्यजन्मतत् ।**
**माया विडम्बनं लोके नटस्य नटनं यथा ॥१३१॥**

" निर्गुण निराकार परमेश्वरस्वरूपाचा साक्षात्कार होणें दुरापास्त आहे, यासाठीं सगुण कृष्णपरमात्म्याची उपासना करावी ह्मणून सांगितलें. कबूल आहे. पण तो सगुण स्वरूप असल्याकारणानें एकदेशीत्वाचा दोष त्यावर येतोच. मग त्याची उपासना कशी करावी ? " या शंकेचें उत्तर खरें पाहतां मागेंच आलें आहे. असो. प्रसंगानुसार येथेंही त्यावर थोडा विचार करणें भाग आहे. कृष्णपरमात्मा सगुण ह्मणजे ज्ञानैश्वर्यवान सर्वव्यापी असा आहे तरी तो अव्यक्त असा आहे. त्याचा प्रसाद झाल्यावांचून तो गोचर व्हावयाचा नाहीं, कारण तो योगमायेनें वेढिलेला आहे. भगवान् ह्मणतातः—

**" नाहं प्रकाशः सर्वस्ययोगमाया समावृतः ।**
**मूढोऽयं नाभिजानाति लोकोमामजमव्ययम् ॥ १॥**

" मजवर योगमायेचें आवरण असल्यां कारणानें मी सर्वत्रांस दृश्यमान होत नाहीं. हे मूढ लोक, मला जन्म नाहीं किंवा मृत्युही नाहीं हें जाणीत नाहींत. " गोकुळांत वगैरे परमेश्वरांनीं जे अवतार धारण केले तीं सर्व मायेचीं सोंगें होत. एकदां नट ज्या प्रमाणें घटकेंत राजाचें व घटकेंत रंकाचें अशीं नानाविध सोंगें घेऊन रंगभूमिवर येतो तसाच हा परमेश्वराच्या अवतारांचा प्रकार होय. कोणतें-ही सोंग घेतलें तरी तो नट जसा सोमाजी किंवा गोमाजी जो कोणी खरा असेल. तोच असतो; त्याप्रमाणेंच परमेश्वर मच्छकच्छादि कोणताही अवतार धारण करून अवतीर्ण झाले तरी त्यांच्या शुद्ध ब्रह्मस्वरूपांत बदल होत नाहीं. राजाचें किंवा कसलेंही दुसरें सोंग घेतलेल्या नटास एकादि बक्षीस दिलेली वस्तु त्या मुळच्या सोमाजीसच मिळते. तद्वतच परमेश्वराच्या कोणत्याही अवताराची उपासना केली तरी ती त्या सर्वव्यापि आदिपुरुषासच पावते. सारांश कृष्णपरमात्मा सगुण असून अव्यक्त आहे आणि अव्यक्त असून निर्गुण नाहीं. विष्णु पुराणांत ब्रह्माचे मूर्त व अमूर्त असे दोन भेद सांगितले आहेत आणि या प्रत्येकाचे पर व अपर असे दोन दोन प्रकार ह्मणजे एकंदर ब्रह्माचे चार प्रकार आहेत. त्यापैकीं दुसरा प्रकार " अपरं अमूर्त्तम् " ह्मणजेच ईश्वर होय, ह्मणून त्या ब्रह्मरूप सर्वांतर्यामीं श्रीकृष्णाची उपासना करावी. आतां एकदेशीत्वाचा आरोप त्याजवर लादण्याचा कोणी प्रयत्न करील तर, रासोत्सवाचे वेळीं सोळा सहस्र गोपीं बरोबर त्यानें अनेक रूपें धारण करून क्रीडा

केली. यावरून काय सिद्ध होतें कीं, त्यास वाटेल त्या वेळेस वाटेल त्या रूपानें प्रगट होतां येते.

" ईश्वरःसर्व भूतानां त्द्दशेऽर्जुन तिष्ठति ।
भ्रामयन्सर्वभूतानि यन्त्रारूढानि मायया । १ ।
" तमेवं शरणं गच्छ सर्व भावेन भारत ।
तत्प्रसादा त्परांशान्ति स्थानं प्राप्स्यसि शाश्वतम् ।२। "

## प्रकरण पंधरावें.

# ब्रह्मविद्या व भक्ति.

तस्मादावश्यकी भक्तिर्नृणां मुक्तिप्रदा हरेः ।
न तथा ब्रह्मविद्यापि विरक्त विषया हि सा ।१३२।
ब्रह्मविद्येव भक्तिः स्याद्भिन्नत्वेऽस्याह्यनित्यता ।
स्वगर्वत्पारतन्त्र्यंचे त्येवं नैव विशंक्यताम् ।१३३।
ब्रह्मविद्या च भक्तिश्चभिन्ने ते स्तः स्वरूपतः ।
फलाधिकारिभेदेन साधनेन च सर्वशः ॥ १३४ ॥

भगवान् नित्यतृप्त असा असूनही जर तो आपणा अज्ञ जीवांचे उद्धारार्थ अवतार धारण करून भूतलावर अवतीर्ण होतो तर आपण पूजनार्चनादि प्रकारेंकरून त्याची भक्ति अवश्यमेव केली पाहिजे. तो भक्तिभावाचाच फार भुकेलेला आहे. आपल्या अनन्यभक्तीचे योगेंकरून जर आपण त्यास संतुष्ट केलें तर शमदमादि ज्ञानसाधना-

वांचूनच आपणांस तो मोक्षाप्रत नेऊं शकतो. भक्तीच्या पुढें त्या ब्रह्मविद्येची कांहींच मातबरी नाहीं, शिवाय ती भक्तीप्रमाणें सुलभही पण नाहीं, हेंही मागें सांगण्यांत आलेंच आहे. विषयतृष्णा नाश पावून जो पूर्ण विरक्त झाला आहे त्यासच ब्रह्मविद्या साध्य होणारी आहे. भक्ति ब्रह्मविद्येपेक्षा सुसाध्य असेल तर असो, दोहोंपासून होणाऱ्या फलप्राप्तींत तरी साम्य असावयाचें होतें, पण तेंही नाहीं. तुह्मास जर वाटत असेल कीं, ज्याप्रमाणें कुंभ व घट हे वर्णाक्षरानींच भिन्न आहेत पण खरें पाहतां ते एकच आहेत त्याचप्रमाणें भक्ति व ब्रह्मविद्या हीं असतील, तर ही मोठी चूक आहे. त्यांचेमध्यें प्रत्येक गोष्टींत कांहींनाकांहीं तरी भेदभाव आहे असें ह्मणण्यास कोणतीही हरकत नाहीं. फक्त स्वरूपानेंच भक्ति व विद्या भिन्न आहेत असें नाहीं, तर त्यांच्या साधनात, त्यांच्यापासून होणाऱ्या फलप्राप्तींत, आणि त्या साध्य करून घेणाऱ्या पुरुषांमध्येंही सर्व प्रकारें भिन्नता दिसून येते. आतां यांच्यामध्यें एवढे भेद कसकसे आहेत याचा थोडा विस्तारेंकरून विचार करू.

विरागाभ्यास योगेन सूक्ष्मा ब्रह्मण्यवस्थिता ।
द्वैतशून्या मनोवृत्ति ब्रह्म विद्येति भण्यते ॥ १३५ ॥
कृष्णानन्त गुणश्रुत्या द्रुतस्याखण्डतां गता ।
परेशे मनसो वृत्ति भक्तिरित्यभिधीयते ॥ १३६ ॥
तत्वमस्यादि वाक्यानां श्रवणं ज्ञानसाधनम् ।
हरेरद्भुतवीर्याणांश्रवणं भक्तिसाधनम् ॥ १३७ ॥

देहदारादिक ऐहिक गोष्टींवरून मन उठून प्राप्त झालेलें

वैराग्य आणि एकांतस्थानीं कृष्णाजिनावर निश्चल मनानें केलेला योगाभ्यास यांच्या योगेंकरून निर्गुणब्रह्मा-चे ठायीं लीन झालेली जी निर्विकार द्वैतशून्य अशी मनाची वृत्ति तीस **ब्रह्मविद्या** असें म्हणतात. कृष्णपरमात्मा सांगतात:—

**" असंशयं महाबाहो मनो दुर्निग्रहं चलम् ।**
**अभ्यासेन तु कौंतेय वैराग्येण च गृह्यते ॥ १ ॥ "**

" मन फार अनिवार व चंचल असें आहे, अभ्यास आणि वैराग्य यांचे योगानेंच त्याचें आकलन केलें पाहिजे. "

जगदात्मा जो कृष्णपरमात्मा त्याच्या प्रल्हाद, ध्रुव, बिभीषण आदिकरून भक्तजनांच्या परिपालनरूप असंख्य गुणांचे श्रवणानें मन आर्द्र होऊन जेव्हां त्याचें सर्व लय ईशचिंतनाकडेच लागून रहातें तेव्हा त्या मनाचे वृत्तीस **भक्ति** असें ह्मणावें.

आतां ह्या ब्रह्मविद्या व भक्ति प्राप्त करून घेण्याचीं साधनें काय आहेत तीं पाहूं.

' तत्वमसि, ' ' ब्रह्मैवाहं, ' ' तत्सत् ' आदिकरून महावाक्यें नेहमीं श्रवण करून आणि त्यावर नीट विचार करून आत्मानात्म विचाररूप ब्रह्मज्ञान प्राप्त होतें, आणि कालीयमर्दन, दावाग्निप्राशन, असुर-विदारण, केशि, कंस-मुष्टिक-चाणूरादि दैत्य निर्दालन वगैरे भगवंताच्या पराक्रमवर्णनपर कथांचें श्रवण केल्यापासून ईशचरणीं अत्यंत भक्ति जडते; तर महावाक्यांवर विचार करणें आणि भगवद्गुणांचें एकनिष्ठेनें श्रवण करणें अशीं हीं ब्रह्मविद्या प्राप्त करून घेण्याचीं दोन साधनें झालीं.

आतां हीं साधनें प्राप्त करून घेऊन तीं साध्य करण्यास कोण अधिकारी होतात याचा विचार कर्तव्य आहे.

**आत्मानात्मविवेकेन योऽतिवैराग्यमाश्रितः ।**
**स एव ब्रह्मविद्यायामधिकारी न चापरः ॥ १३८ ॥**
**भक्तौ तु प्राणिनः सर्वे श्रद्धावन्तोऽधिकारिणः ।**
**दुराचारोऽपि मन्निष्ठः साधुरित्याह यद्धरिः॥ १३९॥**

आत्मानात्म विचार करून ज्यास पूर्णवैराग्य प्राप्त झालें आहे त्यासच ब्रह्मविद्या प्राप्त करून घेण्याचा अधिकार पोंचतो. वैराग्यास साधनीभूत अशीं आणखीं तीन ब्रह्मविद्येचीं साधनें आहेत.

या एकंदर चारीही साधनांस साधनचतुष्टय अशी संज्ञा आहे. तीं साधनें कोणतीं तर? १ **नित्यानित्य वस्तु-विवेक** ( ह्मणजे नित्य वस्तु एक ब्रह्म आहे, तद्व्यतिरिक्त सर्व अनित्य हे ज्ञान ) २ **इहामुत्र फलभोगविरागः** ( ह्मणजे स्रक् चंदन वनितादि ऐहिक सुखासंबंधी किंवा स्वर्गादि भोगासंबंधी मनाचे ठायीं इच्छा नसणे ) ३ **साधन षट्कसंपत्तिः ।** ( ह्मणजे शमदमादि सहा मनोनिग्रहाचीं साधनें ) आणि ४ **मुमुक्षत्वम् ।** ( ह्मणजे मोक्षप्राप्तीची इच्छा ) हें साधनचतुष्टयसंपन्न जो पुरुष असेल तोच चित्तैकाग्रतेनें ब्रह्मविद्या संपादन करण्यास योग्य ह्मणावयाचा. इतर केवळ अपात्रच होत.

आतां भक्तिमार्ग साध्य करून घेण्यास कोण अधिकारी असतो असें ह्मणाल तर विरक्त, अविरक्त सदाचारी, दुराचारी, ब्राह्मण, शूद्र कसाही असला तरी त्यास भगवद्भक्ति प्राप्त होऊं शकते. एक फक्त श्रद्धावान् तो असला ह्मणजे झालें; मग दुसरी कशाचीही गरज नाहीं. दुराचारी मनुष्यही

भक्तिमान होऊं शकतो. हें ऐकून कित्येकांना आश्चर्य वाटलें असेल, आणि तसें वाटणेंही साहजीक आहे. परतु यास प्रमाण प्रत्यक्ष भगवद्वचनच दिलें ह्मणजे झालें. श्री भगवान् अर्जुनास सांगतात:–

" अपि चेत्सुदुराचारो भजते मामनन्य भाक् ।
साधुरेव समन्तव्यःसम्यग्व्यवसितोहि सः ॥ १ ॥
" क्षिप्रं भवति धर्मात्मा शश्वच्छान्ति निगच्छति ।
कौन्तेय प्रतिजानीहि न मे भक्तः प्रणस्यति ॥ २ ॥"

अजामिळासारखा अगदी दुराचारी पुरुष कां असेना तो जर अनन्यभावानें ईश्वरोपासना करावयास लागला असेल तर त्यास साधु असें ह्मणण्यास कोणतीही हरकत नाहीं. ' अंतकाळीं जशी बुद्धि उत्पन्न होते तदनुसारच गति प्राप्त व्हावयाची. ह्मणून ज्यानें आपलें आयुष्य भक्तीलाच अर्पण केलें आहे तो आधीं जरी दुराचारी असला तरी सर्वोत्तमच ह्मटला पाहिजे. एकदां पुरांत सांपडलेला मनुष्य जर बचाऊन पैलतीरास लागला तर ज्या प्रमाणें त्याचें पुरांत सांपडणें व्यर्थ तद्वतच प्रथम दुराचारी असलेला मनुष्य शेवटीं भक्ति केल्याच्या योगानें चांगला असा ठरतो. भगवद्भक्तीचा आश्रय केल्यावर तो दुराचारी असूनही धर्मात्मा होण्यास त्यास किती उशीर लागणार आहे! ज्या प्रमाणे दिव्यानें दिवा लावला ह्मणजे आधिं कोणता लावला हें ओळखतां येत नाहीं त्याच प्रमाणें एक निष्ठेनें परमेश्वराचें आराधन करणारा मनुष्य साक्षात् ईश्वरस्वरूपच होऊन जातो. असा भक्तीचा प्रभाव आहे.

तिला कुलीनमणा, उच्चयोनी किंवा विद्वत्ता यांचीही गरज लागत नाहीं. भगवान् आगर्वी ह्मणतातः—

" मांहि पार्थ व्यपाश्रित्य येऽपिस्युःपापयोनयः ।
स्त्रियो वैश्यास्तथा शूद्रास्तेऽपि यान्ति परांगतिम् । १ ।"

ओढे-नाले ही संज्ञा ते गंगाजलास पोंचले नाहींत तों पर्यंतच. ते एकदां तेथें जाऊन मिळाले ह्मणजे गंगास्वरूपच होऊन जातात.

सर्वतो वृत्तिरोधेन विगतद्वैत चेतसः ।
परमात्म सुखावाप्तिर्ब्रह्मविद्या फलं परम् ॥ १४० ॥
भगवद्गुण माहात्म्य श्रवणोत्सुकचेतसः ।
तस्मिन्प्रेम प्रकर्षो हि भक्तेः फलमनुत्तमम् ॥ १४१ ॥

विषयसुखाची इच्छा सर्व प्रकारें नाश पावून ज्याच्या मनाचें पूर्ण आकलन झालें आहे आणि द्वैत ह्मणजे काय हें ज्यास मुळींच ठाऊक नाहीसें झालें आहे अशा निर्विकार अंतःकरणाच्या पुरुषास परमात्मसुखाची प्राप्ति होणें ह्मणजेच त्यास ब्रह्मविद्येचें फल मिळणें होय; आणि दुष्टांचें दमनकरणें, सज्जनाचें परिपालनकरणें असें परमेश्वराचें वर्णन ज्यांत वर्णिलें आहे अशा रसाळ कथा श्रवणकरण्यास ज्याचें मन अत्यंत उत्सुक होत असतें अशा पुरुषाचे अंतर्यामी भगवत्प्रेमाचा अलोट पूर येणें हें भक्तिपासून प्राप्त होणारें फल होय.

अशा प्रकारें ब्रह्मविद्या व भक्ति यांच्या स्वरूपांत, फलनिष्पत्तींत वगैरे किती भिन्नता आहे हें दाखविलें.

आतां भक्तीनें आर्द्र झालेलें अंतःकरण तदाकार कसें होऊं शकतें हें एक दृष्टांत घेऊन सिद्ध करून दाखवूं.

द्रुतेन चेतसाऽऽकारो गृहीतो योऽखिलात्मनः।
प्राप्तावस्थान्तरेणापि न पुनस्त्यज्यते हि सः॥१४२॥
स्वाभाविक हिमेनापि जतुना वन्हियोगतः।
द्रुतेन हिङ्गुलाकारो गृहीतो यः पुनर्हि सः॥ १४३ ॥
दशान्तर गतेनापि न यथा त्यज्यते तथा।
तापकैः स्नेहकामाद्यै र्द्रुतेन चेतसा हि सः॥ १४४॥

भगवद्भक्तीच्यायोगानें अंतःकरण आर्द्र झाल्यावर आपल्या इच्छेस येईल त्या प्रकारच्या द्विभुज किंवा चतुर्भुज भगवन्मूर्तीचें ध्यान करून परमेश्वराचा आकार एकदां प्राप्त झाला ह्मणजे अन्य विषय चिंतनानें जरी दुसरी एकादी अवस्था धारण करावी लागली तरी मग तो आकार पुन्हां कधींही नष्ट होत नाहीं. तदाकारतेप्रत मजल गेली ह्मणजे मग तेथून पतन पावण्याची मुळींच भीती नाहीं. यास दृष्टांत, लाखेचा घेऊं. लाख स्वभावतः कठीण असते; ती विस्तवावर ऊन केली असतां हिंगळाप्रमाणें लाल होऊन तिचें वितळून पाणी होतें. आतां ही द्रवावस्था जाऊन ती पुन्हां जरी कठीण झाली तरी तिला प्राप्त झालेला हिंगुळाकार ती टाकीत नाहीं. त्याचप्रमाणें स्नेहकामादिनीं तप्त झालेल्या अंतःकरणाची गोष्ट आहे. एकदां प्राप्त झालेला भगवदाकार तें सोडीत नाहीं. गोपी, कंस, पांडव, वसुदेव, शिशुपाल, वक्रदंत यांचीं मनें, काम, भय, स्नेह, भगवन्नि-र्णयाबद्दल शोक, द्वेष, क्रोध, अशा निरनिराळ्या विकारांनीं जरी तन्मय झालीं होतीं तरी त्यांच्या त्या तादात्म्य

झालेल्या स्थितींत मुळींच कधीं बदल झाला नाहीं. कामक्रोधादि नीच मनोवृत्तीनींही तन्मय झालेल्यांना जर तादात्म्यता प्राप्त झाली तर ज्यांना भगवद्भजनाशिवाय दुसरा धंदाच उरला नाही अशा अनन्यगतिक भक्तांना ती प्राप्त होईल यांत काय संशय? सारांश. तापविलेल्या लाखेस हिंगुळाकार ज्याप्रमाणें कायमचा प्राप्त होतो त्याप्रमाणेंच भगवद्गुणश्रवणानें द्रवीभूत झालेल्या अंतःकरणांत प्राप्त झालेली तदाकारता कधींही नष्ट होत नाही.

**एवं विस्तरशःसर्वं वर्णितं मधुसूदनैः ।**
**भक्तिरसायनग्रन्थो रसिकानां मुदिच्छुभिः । १४५ ।**
**इत्थं भगवति प्रेम येन भक्तेन वर्द्धितम् ॥**
**लभते स परां काष्ठां भक्तेस्तद्गत मानसः ॥ १४६ ॥**
**शृण्वन्भगवतो वीर्यं मौत्सुक्याद्बाष्प लोचनः ।**
**पुलकाङ्कित सर्वाङ्गः प्रेमगद्गदया गिरा ॥ १४७ ॥**
**तन्नामानि पठन्नुचैः क्वचिद्धसति रौति च ।**
**परानन्देऽञ्जसा मग्नस्तुष्णीमास्तेऽतिनिर्वृतः॥१४८**

भगवद्भक्तीनें आर्द्र झालेलें मन व लाख यांचा दृष्टांत श्रीमधुसूदनाचार्यांनी आपल्या भक्तिरसायन नामक ग्रंथांत फार विस्तृतपणें वर्णिलेला आहे उपपादन अनेक उपपत्ति देऊन सुगम केलें आहे. त्यांची सामान्यजनास ज्ञानमार्गास लावण्याची इच्छा खरोखर फारच वर्णनीय म्हटली पाहिजे. असो.

अशा प्रकारें त्या षड्गुणैश्वर्य वासुदेवांचे ठायीं तद्गुणश्रवण-कीर्तनादि उपायांनी प्रेम वृद्धिंगत होऊन अंतःकरण

भगवन्निष्ठ झालें ह्मणजे तो भक्तोत्तम भगवत्प्रीतिरूप परमोच्च अवस्थेप्रत प्राप्त होतो. परमेश्वराच्या गोवर्धनोद्धारण, सेतुबंधनादि पराक्रमवर्णनपर कथा एकल्यानें आपणांस ईश्वरी स्वरूपाचा साक्षात्कार केव्हां होईल अशी त्यास तळमळ लागून जाते.

" अजातपक्षा इव मातरं खगाःस्तन्यं यथा वत्सतराः क्षुधार्ताः । प्रियं प्रियेव व्युषितं विषण्णा मनोऽरविन्दाक्ष दिदृक्षते त्वाम् ॥ १ ॥ "

ही स्वरूपसाक्षात्काराची तळमळ किती विलक्षण असते याचें कविराज वर्णन करतात कीं, पंख न फुटलेल्या पक्षांच्या पिलाना ज्या प्रमाणें आई चारा घेऊन केव्हां येईल व केव्हां एकदां आपले तोंडांत घालील असें होऊन जात असतें, किंवा क्षुधेनें व्याकूळ झालेल्या लहानग्या वासरास जसें आपण खुंट्यापासून केव्हां सुटीन व केव्हां एकदां मातेच्या कासेंत आपणास तोंड घालावयास सापडेल असें वाटत असतें, तद्वतच त्या भक्तोत्तमाची स्थिति स्वरूपदर्शनावांचून व्याकुळ अशी झालेली असते.

एकदा स्वरूपसाक्षात्कार प्राप्त झाला ह्मणजे त्यांची स्थिती इतकी चमत्कारिक होऊन जाते कीं, त्यांच्या नेत्रांतून अश्रुप्रवाह लोटावयास लागून सर्वांगावर थरारून कांटा उभा रहातो. आनंदातिरेकानें कंठ दाटून जातो, आणि अडखळत अडखळत " श्री राम कृष्ण, श्री राम कृष्ण " असे नाममंत्राचे उच्चार मुखांतून निघावयास लागतात. केव्हा केव्हां तर, " ईश्वर अजिंक्य असूनही आह्मी भक्तानीं पहा कसें त्यास जिंकून टाकिलें आहे

असें ह्मणून खदखदां हंसत सुटतात आणि केव्हां केव्हां लागलींच बापा त्वां किती वेळ तरी आमचा अंत पाहून आह्मांस व्यर्थ शिणविलेंस? " असा मोठमोठ्यानें आक्रोश करून घळघळां रडावयासही लागतात श्री मद्भागवतांत देखील असेंच सांगितलें आहेः—

" एवं व्रतःस्वप्रियनामकीर्त्या जातानुरागोद्रुतचित्त उच्चैः । हसत्यथोरोदिति रौति गायत्युन्मादवन्नृत्यतिलोकबाह्यः ॥ १ ॥ "

या हर्षातिरेकाचा हा भर एकदां लोटून गेला ह्मणजे मग मन निश्चळ होतसतें परमानंदांत निमग्न होऊन जातें. एकादशस्कंधात वर्णिलें आहेः—

" क्वचिद्रुदन्त्यच्युतचिन्तया क्वचिद्धसन्तिनन्दन्ति वदन्त्य लौकिकाः । नृत्यन्ति गायन्त्यनुशीलयन्त्यजं भवन्ति तूष्णींपरमेत्य निर्वृताः ॥ २ ॥ "

अशी ही भगवन्निष्ठेपासून भक्तीची पराकाष्ठा प्राप्त होते. आतां ह्या सगुणध्यानापासून निर्गुणध्यानाचें प्राप्त होणारें समाधिसुख कसें प्राप्त होणार अशी शंका कोणी घेतल्यास तिचें समाधान खालील उताऱ्यां वरून होईल. भगवान् कपिल महामुनी ह्मणतातः—

" एवं हरौ भगवति प्रतिलब्ध भावो भक्त्याद्रव हृदय उत्पुलकः प्रमोदात् । औत्कण्ठ्य बाष्पकलया मुहुरर्द्यमानस्तच्चापि चित्तबडिशं शनकैर्वियुङ्क्ते १ "

" मुक्ताश्रय यर्हि निर्विषयं विरक्तं निर्वाण-

मृच्छतिमनः सहसा यथार्चिः ॥ आत्मानमत्र पुरुषो व्यवधान मेकमन्वीक्षते प्रतिनिवृत्तगुण प्रवाहः ॥ २ ॥ देहो पि दैव वशगः खलु कर्मया वत्स्वारम्भकं प्रतिसमीक्षत एवसासुः । तं सप्रपञ्चमधिरूढ समाधियोगः स्वाप्नं पुनर्न भजते प्रति बुद्ध वस्तुः ॥ ३ ॥"

ह्मणजे परमेश्वराचेठायीं अनन्यभक्ति जडून त्याजवर निरपेक्ष प्रेम जडलें ह्मणजे हलके हलके मनाचे सर्व प्रकारचे पाश तुटून तें मुक्त होतें. देहासंबंधीं किंवा प्रपंचाविषयीं कोणतीही चिंता तें करिनासें होऊन त्याचें सर्व ध्यान ईशचरणीं लागतें; त्यांतच त्याचें सर्वसुख आहे.

---

## प्रकरण सोळावें.

## भक्त आणि ज्ञानी.

एवं विधः परेशस्य भक्तः प्रियतमो यथा ।
न तथातिवरिष्ठोऽपि ब्रह्मिष्ठः प्रेम भाजनम् ॥ १४९

वर निर्दिष्ट केलेल्या मार्गानें जे भगवद्भजन करून, त्या कृपाछत्राची प्रीति संपादन करून घेतात ते जितके त्यास प्रिय होतात तितके मोठमोठे ब्रह्मनिष्ठ देखील होत नाहींत. कारण भगवद्भक्त जे आहेत ते भगवंतासाठीं भगवत्भजन करतात, त्यांना स्वतःस अशी कोणतीच इच्छा

नसते. सुग्रीव, बिभीषण, हनुमंत हे तिघेही रामोपासक होते खरे. पण सुग्रीव, बिभीषणांना सीतादेवीनें दिलेल्या नवरत्नहारांत " राम " नाहीं ह्मणून एक एक रत्न फोडून टाकणाऱ्या मारुतीरायाची योग्यता येईल काय? किंवा पितृवचन परिपाळनार्थ स्वतः श्रीरामचंद्रानें दिलेल्या राज्याचा अभिलाष न धरतां प्रभु परत येईपर्यंत त्यांच्या पादुकांची सेवा करून राहणाऱ्या बंधुवर्य भरताची ते बरोबरी करूं शकतील काय? हनुमान व भरत हे दोघेही अनन्य भक्त होते ह्मणूनच ते भगवंतास अधीक प्रीय झाले. प्रथम ईशप्राप्त्यर्थ ईश्वराराधन करून नंतर इष्टहेतु सफळ झाल्यावरही जे, आपल्या उपासनेंत अंतर आणीत नाहींत तेच खरे भक्त, तेच खरे ज्ञानी. " दुखणें सरो व वैद्य मरो " या न्यायानें मोक्षप्राप्ति झाल्याबरोबर ईश्वर वगैरे कांहींएक न जाणणारे फक्त मुमुक्षु असे लोक ईश्वरास कसे बरे आवडतील? एकादशस्कंधांत श्री भगवान् ह्मणतातः—

" न तथा मे प्रियतम आत्मयोनि र्न शङ्करः ।
न च संकर्षणो न श्री र्नैवात्मा च यथा भवान् । १ । "

" मला माझे भक्त जितके प्रिय आहेत तितके माझ्या स्वतःच्या नाभिकमळापासून संभव पावलेले ब्रह्मदेव, माझे स्वरूपभूत शंकर, भ्राता संकर्षण किंवा पत्नी लक्ष्मी, हे देखील नाहींत; फार तर काय पण माझ्या आत्ममूर्तिवरही माझी इतकी भक्ति नाहीं ! " असें जर आहे तर मग भक्तिविहीन असे लोक, मग ते ज्ञानी कां असेनात, भगवन्तास कसे प्रीय व्हावेत? बरें तर मग—

ज्ञानविज्ञान संसिद्धाः पदं श्रेष्ठं विदुर्मम ।
ज्ञानी प्रियतमोऽतो मे ज्ञानेनासौ बिभर्ति माम् ॥ १ ॥"

या भगवद्वचनाची काय वाट लावावयाची ? ज्ञानी परमेश्वरास अप्रिय जर ह्मणावेत तर वरील उक्तीस हरताळ लावावा लागतो! ठीक आहे. इतकें गोंधळून जाण्याचें कांहीं एक कारण नाहीं. याचा खुलासा पुढें भगवंतानींच स्वतः केला आहे. तो पहाः-

" तपस्तीर्थं जपो दानं पवित्राणी नराणिच ।
नालं कुर्वन्ति तां सिद्धिं या ज्ञानकलया कृता ॥ १ ॥
तस्माज्ज्ञानेन सहितं ज्ञात्वा स्वात्मानमुद्धव ।
ज्ञानविज्ञान संपन्नो भज मां भक्ति भावितः ॥ २ ॥"

ज्ञानी ह्मणजे अप्रिय आहेत असें नाहीं. पण त्यांच्या त्या ज्ञानास भक्तीचा आश्रय पाहिजे, तो जर असेल तरच त्यांचा उपयोग. नाहीं तर " व्यर्थ भाराभर " काय उपयोगी ? प्रथम तपस्वी, कर्मठ किंवा ज्ञानी यांच्या पेक्षांही योगी श्रेष्ठ आहेत असें सांगून नंतर अर्जुनास भगवान् ह्मणतातः-

" योगिनामपि सर्वेषां मद्गते नान्तरात्मना ।
श्रद्धावान्भजते यो मां स मे युक्त तमो मतः ॥ १ ॥"

ह्मणजे त्या योगीलोकांपेक्षांही भक्तांची महति अधिकच आहे! या भगवद्भक्तांचे स्वरूप कसें असतें व ते हरीला किती प्रिय होतात हें खालील गीताश्लोकांतून काय सुरेख वर्णिलें आहे पहाः-

" अद्वेष्टा सर्व भूतानां मैत्रः करुण एवच ।
निर्ममो निरहङ्कारः समदुःख सुखः क्षमी ॥ १ ॥
" संतुष्टः सततं योगी यतात्मा दृढनिश्चयः ।
मय्यर्पित मनोबुद्धि र्यो मद्भक्तः स मे प्रियः ॥ २ ॥
" यस्मान्नोद्विजते लोको लोकान्नो द्विजतेचयः ।
हर्षामर्ष भयोद्वेगैर्मुक्तो यः स च मे प्रियः ॥ ३ ॥
" अनपेक्षः शुचिर्दक्ष उदासीनो गतव्यथः ।
सर्वारम्भ परित्यागी यो मद्भक्तः स मे प्रियः ॥४॥
" समः शत्रौ च मित्रे च तथा मानापमानयोः ।
शीतोष्ण सुखदुःखेषु समः संग विवर्जितः ॥ ५ ॥
" तुल्य निन्दा स्तुती मौनी संतुष्टो येन केन चित् ।
अनिकेतस्थिरमतिर्भक्तिमान्मे प्रियो नरः ॥ ६ ॥
" ये तु धर्म्यामृतमिदं यथोक्तं पर्युपासते ।
श्रद्धानामत्परमा भक्तास्तेऽतीव मे प्रियाः ॥ ७ ॥"

" योगसिद्धीनें अंतर्बाह्य पवित्र झाल्यावरही जो परमे-
राचेठायीं भक्तिपुरःसर प्रेम ठेवतो तोच भक्त, तोच
ोगी, आणि तोच मुक्त; त्याला सर्व प्राणिमात्रांच्याठायीं
ष ह्मणून कसला तो माहीतच नसतो गायीची तहान
ागवावी व वाघाला विष होऊन मारून टाकावें, असें
दकाच्या मनांत कधीं तरी येईल काय? आणखी हे
क्त कसे असतात तर, " समुद्राच्या खळाळानें जलच-
ांना ज्याप्रमाणें भय उत्पन्न होत नाहीं, आणि जलचरें
शीं समुद्र सोडून कोठें जात नाहींत, त्याप्रमाणें जगा-

च्या उन्मत्तपणानें त्यांना खेद होत नाहीं." असे द्वंद्वातीत भय व उद्वेग रहीत भक्तजन परमेश्वरास अति प्रिय व्हावेत हें साहजीकच आहे. त्यांची भगवद्भक्ति केवळ निरपेक्ष अशी असते. "संसारदुःखापासून सुटलेला, निरिच्छेनें शोभलेला, व्याधाच्या हातून सुटलेला जसा पक्षी असावा त्याप्रमाणें ते निरंतर सुखांत मग्न झालेले असतात. सूर्याला जशी रात्र व दिवस हीं नाहींत, त्याच प्रमाणें त्यांना चांगलें किंवा वाईट हीं समजत नाहींत. वैषम्याची त्यांना वार्ता सुद्धां नसते. मित्र शत्रु ते सारखेच मानितात. त्यांच्या येथें निंदा किंवा स्तुति यांना सारखाच मान मिळतो. असे जे आपलें सर्वस्व ह्मणजे ईश्वर असें मानून त्याजवर प्रेम ठेवितात तेच खरे भक्त व तेच खरे योगी. परमेश्वर ज्ञान्यापेक्षां अशा निःसीम भक्तांचाच फार भुकेला असतो.

**योगैश्वर्यपरेशस्य नित्यं पश्यति भक्तिमान् ।**
**ज्ञानी तु केवलं शुद्धं नित्यं ब्रह्मैव पश्यति ॥१५०॥**

परमेश्वराला या निरपेक्ष भक्तांची इतकी जी आवड आहे यांतलें इंगित काय असावें? तर भक्तिमान हे ईश्वराचें मायावैभव त्याजपासून निराळें आहे असें मुळींच मानीत नाहींत. श्रीमद्भागवतांत भगवान् ह्मणतातः—

**"सर्वभूतेषु यः पश्येद्भगवद्भावमात्मनः ।**
**भूतानि भगवत्यात्मन्येष भागवतोत्तमः॥ १ ॥"**

"कृमिकीटकादि करून सर्व भूतमात्रांचेठायीं सर्व जग व्यापून राहिलेला परमेश्वरच वास करीत आहे अशी

ज्यांची दृढ समजूत झालेली असते तेच खरे भक्तोत्तम." ज्या ज्या वस्तूकडे त्यांची दृष्टी जाते त्यांत त्यांत ईश्वरच आहे अशी त्यांची मनापासून भावना झालेली असते. ज्ञानी लोकांचें तसें नाहीं. ब्रह्मापासून मी भिन्न नाहीं, सर्वांचें अधिष्टान माझ्यात आहे व त्याचा लयही माझ्यांत होतो. अशी त्यांची समजूत झाली असल्याकारणानें आत्म्याव्यतिरिक्त ते कशासच पूज्य मानीत नाहींत. तेथें मीपणाचा भाव कायम राहिलेला असतो. तो घालविण्यास भक्तिचाच आश्रय केला पाहिजे; ह्मणून भक्तीस **ज्ञानकलिका** अशी संज्ञा दिलेली आहे.

**" ज्ञानविज्ञान संपन्नो भजमां भक्ति भावितः । "**

या भगवदुक्तीवरूनच हें उघड होत आहे कीं, भक्ती शिवाय ज्ञान हें लंगडें आहे. **आर्त, जिज्ञासु, अर्थार्थी व ज्ञानी** असे चार प्रकारचे ईश्वरोपासक असतात. ते सर्वही परमेश्वरास प्रियच आहेत पण त्यांतही भक्तीच्या आश्रयानें ज्ञानाचें अवलंबन करणारे जे असतात ते श्रेष्ट होत: श्रीभगवान् ह्मणतात:—

**' चतुर्विधा भजन्तेमां जनाः सुकृतिनोऽर्जुन ।**
**आर्तोजिज्ञासुरर्थार्थी ज्ञानी च भरतर्षभ ॥ १ ॥'**
**' तेषां ज्ञानी नित्ययुक्त एक भक्तिर्विशिष्यते ।**
**प्रियोहि ज्ञानिनोऽत्यर्थमहंसच मम प्रियः ॥ २ ॥'**

आतां ह्यांत आर्त असतो तो आपलें संकटांतून निवारण व्हावें ह्मणून ईश्वरोपासना करतो, जिज्ञासुला ज्ञानप्राप्तीची इच्छा असते, अर्थार्थी आपणास धन प्राप्त व्हावें

ह्मणून ईश्वराचें भजन करीत असतो पण चवथा जो ज्ञानी तो केवळ निरपेक्ष बुद्धीनें ईश्वर भजन करतो ह्मणून तोच खरा भक्त ह्मणावयाचा, कारण तो कोणत्याही मोहपाशानें बांधलेला नसल्या कारणानें त्याच्या एकनिष्ठभक्तीत विक्षेप ह्मणून मुळींच येऊं शकत नाहीं. परमेश्वराची त्याजवर कृपा विशेष असण्याचें कारण हेंच असलें पाहिजे. " दुभत्याच्या आशेनें सारें जग गायीला दावें लावतें पण वासराचें दावें दोराशिवायच किती बरें बळकट असतें? तें केवळ तिच्यावरच जीव ठेवून असल्यामुळें गाय ही तशीच त्यावर प्रीति ठेविते. " अशा प्रकारें ज्ञानी असून जे भक्तिमान आहेत ते ईश्वरास अधिक प्रिय होतात.

" बहूनां जन्मनामन्ते ज्ञानवान्मां प्रपद्यते ।
वासुदेवःसर्वमिती स महात्मा सुदुर्लभः । १ । "

केवळ ईश्वरभक्तिप्राप्त्यर्थच त्यांना किती तरी दुस्तर संकटें सोसावीं लागलेलीं असतात. " प्रथम त्यांस विषयाच्या निबिड अरण्यांतून त्यांतील कामक्रोधाचीं संकटें टाळून सद्वासनांच्या पर्वतावर यावें लागतें. पुढें इच्छारूप वाहणा पायांत न घालतां अनवाणीच साधु लोकांच्या मदतीनें असत्कर्माच्या मोहक वाटा चुकवून शेंकडों जन्मांचा प्रवास करावा लागतो. शरीरसंयोगाच्या रात्रींत बापडा एकटाच सैरावरा धांवत असतो. इतक्यांत कर्मक्षयाच्या उजेडानें पहांट होते, मागाहून गुरूकृपारूप उषःकाळ होतांच, ज्ञानाचें कोंवळें ऊन पडतें आणि समदृष्टीचें वैभव त्याच्या दृष्टीस दिसूं लागतें. त्यावेळीं ज्या ज्या दिशेकडे तो पाहतो त्या त्या दिशेकडे त्यास एक परमेश्वरच दिसत

असतो. ज्याप्रमाणें डोहांत घागर बुडाली असतां तिच्या आंत बाहेर सर्वत्र पाणीच होऊन जातें, त्याप्रमाणें तो ईश्वराचे आंत व त्याच्या आंत बाहेर परमेश्वररूपच होऊन जातो. हें चराचर सर्व जग वासुदेवरूपी आहे असा स्वानुभवावरून त्याचे मनांत ठसा उमटून राहिलेला असतो. ह्मणून ज्ञानीही तोच आणि भक्तांचा राजाही तोच, असा महात्मा महा दुर्लभ आहे. आशारूप अंधःकारानें ज्यांचे डोळे मंदावले आहेत, असे सुखोपभोगाप्रीत्यर्थ भजनीं लागणारे दुसरे भक्त पुष्कळ असतात. ते ईश्वरास इतके प्रिय कां होत नाहींत हें आतां निराळें सांगण्याची गरज उरली नाहीं. त्यांची ईश्वरभक्ति सापेक्ष असते, तरी त्यांच्या दर्जाप्रमाणें त्यांना फलप्राप्ति होतेच. त्यांची ह्मणजे परमेश्वर अगदीं उपेक्षा करतो असें नाहीं. कारण शरणागतांस विसरणें हें त्याचें ब्रीद नव्हे:—

" उदाराः सर्व एवैते ज्ञानी त्वात्मैव मे मतम् ।
आस्थितः सतु युक्तात्मा मामेवा नुत्तमां गतिम् १ "

ज्ञानी हा भगवंताचा जीवप्राण होऊन बसतो हें खरें पण दुसरे भक्तही जास्तकमी प्रमाणानें त्याचे आवडतेच असतात. नदी येऊन समुद्राला मिळाली ह्मणजे तिचें मागें परतणें राहतें, तद्वतच परमेश्वरस्वरूप ओळखून जे त्याजकडे धांव घेतात. ते तद्रूप झाल्याशिवाय राहत नाहींत. आतां ज्ञानसंपन्न भगवद्भक्ताची बरोबरी ते करूं शकत नाहींत ही गोष्ट वेगळी:—

" ब्रह्मभूतः प्रसन्नात्मा न शोचति न काङ्क्षति ।
समः सर्वेषु भूतेषु मद्भक्तिं लभते पराम् ॥ १ ॥

" भक्त्या मामभिजानाति या वत्पश्यातितत्वतः ।
ततो मां तत्वतो ज्ञात्वा विशते तदनन्तरम् ॥२॥ "

" त्या ब्रह्म होणाऱ्या योग्यतेस पोंहचलेला पुरुष असतो तो मग आत्मज्ञानप्रसन्नतेच्या सिंहासनावर बसतो. " " तेव्हां आत्मज्ञानासाठीं शोक करावा, कांहीं मिळण्याची इच्छा धरावी, हेंच संपतें. " " पाटीवर असलेलीं अक्षरें जशीं पुसून टाकतां येतात, त्याप्रमाणें त्याच्या दृष्टींतील भेदाभेद मोडून जातात. " तेव्हां कल्पांताच्या वेळेला नदीची व सिंधूची मर्यादा सारीच मोडून ब्रह्मलोकापर्यंत जसें सारं पाणीच पाणी होऊन जातें, किंवा घट आणि मठ दोन्हीं नाहींशीं झालीं म्हणजे आकाश जसें एक होऊन राहतें, किंवा लांकूड जळल्यानंतर तें जसें विस्तवच बनतें, किंवा अलंकारांवरचे ठसे मुशींत आटून गेले म्हणजे सोनें जसें नाम, रूप- ह्यांच्या भेदाला सोडून देतें, हेंही असो, जागें झालेल्यास ज्याप्रमाणें स्वप्न हें असत नाहीं आणि तो जसा आपल्याच ठिकाणीं उरतो. त्याप्रमाणें माझ्या एकाशिवाय त्याला त्याच्यासहवर्तमान दुसरें कांहींच दिसत नाहीं; अशी परमेश्वराची चौथी भक्ति त्यास प्राप्त होते. " ज्ञानी हिला आपली ज्ञानकला असें म्हणतात. ही भक्ति, कर्मयोगी जेव्हां भक्तिमार्गाचा आश्रय करितात तेव्हांच त्यांना प्राप्त होते. तेव्हां कर्म आणि कर्ता हें जाऊन सर्वच ईश्वरमय होतें. आरशानें आरशाला पाहिलें तर न पाहिल्यासारखेंच होतें. सुवर्णानें सोनें झाकलें तर तें जसें झांकत नाहीं तद्वतच ईश्वररूप होऊन केलेलें कर्म तें केलें कसलें ? तें तद्रूपच होतें;

मशी ज्यांची दृष्टी भेदाभेदशून्य झालेली असते ते भ-
क्तोत्तमच खरे ज्ञानी. भगवद्भक्तिशिवाय असलेलें ज्ञान
केवळ पोकळ होय. ईश्वरस्वरूपाचें खरें दर्शन होण्यास
ज्ञान्यांनीं भक्तीचाच आश्रय केला पाहिजे. श्रीकृष्णपर-
मात्मा भक्तशिरोमणिअर्जुन ह्यास आपलें विश्वस्वरूप
दाखवून ह्मणतात:—

" नाहं वेदैर्न तपसा न दानेन न चेज्यया ।
शक्य एवं विधो द्रष्टुं द्रष्टवानसि मां यथा ॥ १ ॥
भक्त्या त्वनन्यया शक्य स्त्वहमेवं विधोऽर्जुन ।
ज्ञातुं द्रष्टुं च तत्वेन प्रवेष्टुं च परन्तप ॥ २ ॥ "

" भक्तराजा! तूं आतां जसा मला पाहिलास तसा
पाहण्यास वेद, यज्ञयाग, किंवा दानधर्म हीं साधनेंही
लंगडीं पडतात. माझें त्या स्वरूपाचें दर्शन होण्यास, एक
भक्तीच जर चित्तास येऊन वरील तर काहीं होणार आहे.
एरवीं तें समजणें किंवा त्याचें दर्शन होणें केवळ अशक्य
आहे. तद्रूप होण्याची गोष्ट तर मग काढावयासच नको."

पण ती भक्ती अनन्य ह्मणजे पर्जन्यास जशी पृथ्वीशि-
वाय दुसरी गति ह्मणून नसतेच, त्या मासल्याची असली
पाहिजे. " क्षीराब्धी जसा दुधानेंच भरलेला असतो,
त्याप्रमाणें एक परमेश्वरापासून तों मुंगी पर्यंत किंबहुना
सर्व चराचरामध्यें भजनाऱ्या त्यांना दुसरी जागाच उरता-
कामानये. " " अशाप्रकारें एकदां ईश्वरी साक्षात्कार
झाला कीं, अहंकाराची यात्रा संपते व तिचे मागून द्वैतास
पाय काढावा लागतो. मग ते भाग्यशाली भक्तजन ऐक्यां-
तच पोंचले ह्मणून समजावें. "

केवळ ज्ञानसंपन्न जे आहेत, ह्मणजे ज्यांना भगवद्भक्तीचा लेशही नाहीं, ते फक्त निर्गुण ब्रह्मनिष्ठ असे असतात. मायेचा आणि शुद्ध ब्रह्माचा कांहींएक संबंध ते जाणत नाहीत. व्यतिरेकसमाधीच्या योगेंकरून स्वतःचे ठायीं असलेल्या जड मलिनादि अविद्यासंस्कारांवर पूर्ण जय मिळवून कालत्रयाबाधित असें जें निर्विकल्प ब्रह्म त्याचीच ते एकभावेंकरून उपासना करतात. सर्व जगभर पसरलेलें जें भगवंताच्या योगमायेचें वैभव त्याची ते मुळींच पर्वा करीत नाहींत परंतु तें सर्व मायामय असें समजून त्याची उपेक्षा करतात. आतां त्यांचा हा मार्ग कितपत योग्य आहे हें पाहूं.

**हेमकुण्डलयोर्भेद आकारान्नैव वस्तुतः ।**
**कुण्डलेक्ष्णोश्चमत्कारो द्रव्यत्वं तूभयोः समम् १९१**
**तथाद्वयं समं वस्तु पश्यतो ज्ञानि भक्तयोः ।**
**आत्मैव सर्वमीश श्चेत्येवं भिन्नैव भावना ॥ १९२ ॥**

सोनें व त्यापासून केलेले कुंडलादि अलंकार यांजमध्यें वस्तुतः कांहीं एक भेद नाहीं अलंकाराना वेगवेगळाले वर्तुलादि आकार दिले असल्या कारणानें ते दिसण्यांत शोभायमान दिसतात इतकेंच. बाकी द्रव्य या दृष्टीनें पाहिलें तर सोनें व ते अलंकार यांचेमध्यें तफावत मुळींच नाहीं. एखाद्या मनुष्यास जर दैवयोगानें विपुल सुवर्ण प्राप्त झालें तर त्यापासून त्यास सुख होईल हें खरें आहे, पण तेंच ज्यापाशीं नानाप्रकारचे सुवर्णाचे अलंकार असून ते तो नित्य धारण करीत आहे त्यास जें सुख व आनंद होणार आहे तें सुख व तो आनंद पहिल्यास प्राप्त

होईल काय? अर्थात होणार नाहीं. त्याचप्रमाणें पूर्व सुकृत-वशात् जर एखाद्यास ब्रह्मप्राप्ति झाली तर त्यास ब्रह्मसुखाचा अनुभव होईल खरा. पण ज्यास ब्रह्मसुख मिळून शिवाय भगवद्गुणानुवादश्रवणानें प्राप्त झालेल्या भगवत्प्रेमाचा उपभोग घ्यावयास मिळत आहे त्या ज्ञानसंपन्न भगवद्भक्ताची तो बरोबरी कसा करूं शकेल?

सुवर्ण व कुंडलादि अलंकार यांजमध्यें वास्तवीक कांहींही भेद नसून फक्त विशिष्टआकारानेंच जसें त्यांमध्यें अंतर दिसून येतें, त्याचप्रमाणें परमेश्वराचे निर्गुण किंवा सगुण स्वरूपांतून भिन्नभाव असा कोणत्याही प्रकारचा नाहीं. आतां निर्गुणोपासक जे ज्ञानी व सगुणोपासक जे भक्तिमान लोक यांजमध्यें जो भेदभाव दिसून येतो, तो केवळ त्यांच्या परस्परांच्या भावनेचाच परिणाम होय. ज्ञानी, ह्या सर्व दृश्यमान् वस्तु, आत्मस्वरूपच आहेत असें मानतात; आणि भक्त जे आहेत ते सर्वत्र ईश्वरच भरला आहे असें मानितात. आत्म्याव्यतिरिक्त सर्व आकारविशिष्टांचें मिथ्यात्व दृष्टोत्पत्तीस आल्यावरून ब्रह्मज्ञान्यांची सर्व काय तें मीच आहे अशी भावना झालेली असते. श्रुतिह्मणते:—

" मय्येवं सकलं जातं मयि सर्वं प्रतिष्ठितम् ।
मयि सर्वं लयं याति तद्ब्रह्माद्वयमस्म्यहम् ॥ १ ॥ "

त्याच प्रमाणें योगवासिष्ठांत ह्मटलें आहे:—

" सर्व भूतान्तरस्थाय नित्यमुक्त चिदात्मने ।
प्रत्यक् चैतन्यरूपाय मह्यमेवनमोनमः ॥ १ ॥ "

ह्मणजे आत्म्याशिवाय ते कशासच पूज्य मानीत नाहींत. परंतु भक्तांचीं समजूत तशी नसते. सर्वत्र परमेश्वराचेंच अधिष्ठान असून आपण त्याचेच अंशभूत–त्याजपासून अभिन्न- असे आहोंत, असा त्यांचा पक्का ग्रह झालेला असतो. भागवतांत ह्मटलें आहे:–

"खं वायु मग्निं सलिलं महीं च ज्योतींषि सत्वानि दिशो द्रुमादिन्। सरित्समुद्रांश्च हरेःशरीरं यत्किंचभूतं प्रणमेदनन्यः ॥ १ ॥"

ईश्वरभावनेनें सर्वभूतांचेठायीं भक्तिमान् लोकांची प्रीति असते. ज्ञानी चित्तविक्षेप होईल ह्या भीतीनें आत्मचिंतनावांचून दुसरा कोणताही धंदा जाणीत नाहींत. ईश्वरभजन देखील ते करीत नाहींत मग त्यांचा सर्व भूतमात्रांचेठायीं पूज्यभाव तो कोठचा असणार! तो वासुदेव व श्री कृष्ण मीच आहे असें ते ह्मणणार! पण असें ह्मणणें ह्मणजे तरंग समुद्रापासून झालेला नसून समुद्रच तरंगाचा झालेला आहे असें ह्मणण्याइतकेंच सयुक्तिक आहे.

अन्तर्बहिश्च यच्चान्यदीशात्पश्यति भक्तिमान्।
ज्ञानं गुह्यतमं त्वेतद्दुर्लभं विदूषामपि ॥ १५३ ॥

भक्तिवान् पुरुष जे आहेत त्यांना अंतर्बाह्य एका ईश्वरस्वरूपावांचून दुसरें कांहीं एक दिसतच नाहीं; आणि हें भक्तलोकांचें ज्ञान वास्तवीक ज्ञानी लोकांच्या आत्मानात्म विचाररूप ज्ञानापेक्षांहा अधीक दुष्प्राप्य असें आहे. आत्मज्ञान झाल्याबरोबर ब्रह्मनिष्ठ जे आहेत ते आपले किंवा इतर जनांचे शरीरव्यापार स्वतःचे आत्मानुसंधा-

ज्ञास बाधक होतील अशा समजुतीनें देहाची ह्मणून मुळींच पर्वा बाळगीत नाहींत. आत्म्याव्यतिरिक्त देहादि सर्व नाशवंत असेंच समजून ते त्यास कुणपवत् ह्मणजे प्रेतवत् मानितात; पण ही चूक आहे. हें जड जगत् आत्म्यापासून भिन्न आहे कीं अभिन्न आहे? भिन्न आहे असें ह्मणतील तर येथें द्वैतभाव आलाच. आणि अभिन्न ह्मणतील तर मग त्याची उपेक्षा करणें कधींही रास्त होणार नाहीं. ह्मणून सच्चिदानंद परमेश्वरापासून अभिन्न असें कांहीं एक नाहीं-सर्वत्र तो भरून उरला आहे असें भावनात्मक जें ज्ञान तें गुह्यतम आहे असें ह्मटलें आहे. भक्त लोक अहंकार, मोहादि सर्व मनोविकारांना गिळूनटाकून नजरेपुढें येणाऱ्या सर्व वस्तु परमेश्वराचींच दृश्य स्वरूपें आहेत अशा भावनेनें अखिल भूतमात्रांवर प्रीति करितात ज्ञान्यांच्या हातून तसें होत नाहीं. श्रीमद्भागवतांत ब्रह्मदेवाप्रत परमात्मा सांगतातः—

“ ज्ञानं परम गुह्यंमे यद्विज्ञान समन्वितम्।
सरहस्यं तदङ्गं च गृहाण गदितं मया ॥ १ ॥
यावानहं यथाभावोतद्रूपगुणकर्मकः ।
तथैव तत्व विज्ञानमस्तु ते मदनुग्रहात् ॥ २ ॥
अहमेवाऽऽसमे वाग्रे नान्यद्यत्सदसत्परम ।
पश्चादहं यदेतच्चयोऽवशिष्येतसोऽस्म्यहम् ॥ ३ ॥
ऋतेर्थंयत्प्रतीयेत न प्रतीयेतचात्मानि ।
तद्विद्या दात्मनोमायां यथाभासो यथातमः ॥ ४
यथामहान्ति भूतानि भूतेषूच्चावचेष्वनु ।

**प्रविष्टान्यप्रविष्टानि तथा तेषु न तेष्वहम् ॥ ९ ॥"**

शास्त्रांतील व अनुभवजन्य असें जें परम गुह्य ज्ञान मी तुला सांगतों तें भक्तिपूर्वक श्रवण कर माझें रूप, गुण, कर्म, आणि माझी सत्ता ह्यांचें यथार्थ ज्ञान हें केवळ माझ्या अनुग्रहानेंच प्राप्त होणारें आहे. सृष्टीचे पूर्वी मीच होतों आणि सृष्टीचे लयाचे वेळींही मीच मागें रहातों. ही सर्वत्र माया जी पसरली आहे तींतही मीच आहे. अंतर्बाह्य व्यापार सर्व मीच करतों. खरें तें खोटें किंवा खोटें तें खरें वाटणें हें देखील माझ्याच मायेचें स्वरूप आहे. ज्याप्रमाणें पृथ्वी, आप, तेज, वायु, आकाश हीं पंचमहाभूतें, उत्तम, मध्यम व अधम प्राण्यांचे ठयीं सर्वत्र असूनही बाहेर देखील असतातच. त्याचप्रमाणें मी त्यांच्यामध्यें आहेही व नाहीं-हीं. त्याच प्रमाणें:-

**" अनन्यचेताः सततं यो मां स्मरति नित्यशः ।**
**तस्याहं सुलभः पार्थ नित्ययुक्तस्य योगिनः ॥ १ ॥"**

इत्यादि भगवदुक्तीवरून सिद्ध होतें कीं, भगवत्तत्व एकदां समजलें ह्मणजे मग मोक्षप्राप्तिही होणें कठीण नाहीं. पण या सर्वांस मूळकारणीभूत होऊन राहणारी ही अनन्यभक्ती होय. तिचा अधिकार केवढा आहे पहाः-

**" पुरुषःस परःपार्थ भक्त्या लभ्यस्त्वनन्यया ।**
**यस्यां तस्थानि भूतानि येन सर्व मिदं ततम् ॥ १ ॥"**

एकदां या निरपेक्ष भक्तीचा आश्रय केला ह्मणजे दुसरीं सर्व साधनें लटकीं पडतात; आणि इष्टहेतु अनायासेंच पूर्ण होतो.

या अनन्यभक्तीच्या योगेंकरून प्राप्त होणारें ज्ञान केती अगाध आहे, व तें प्राप्त झालें असतां मनुष्य केवढ्या योग्यतेस पोंचतो हें श्रीमद्भगवद्गीतेंतील नवव्या अध्यायाचे आरंभींच परमात्म्यानीं सांगितलें आहेः—

"इदं तु ते गुह्यतमं प्रवक्ष्याम्यनसूयवे।
ज्ञानं विज्ञान सहितं यज्ज्ञात्वा मोक्ष्यसेऽशुभात् ॥१॥
राजविद्या राजगुह्यं पवित्रमिदमुत्तमम् ।
प्रत्यक्षावगमं धर्म्यं सुसुखं कर्तुमव्ययम् ॥ २ ॥
अश्रद्दधानाः पुरुषा धर्मस्यास्य परंतप ।
अप्राप्य मां निवर्तन्ते मृत्युसंसारवर्त्मनि ॥ ३ ॥
मया ततमिदं सर्वं जगदव्यक्तमूर्तिना ।
मत्स्थानि सर्वभूतानि न चाऽहं तेष्ववस्थितः। ४।"

प्रत्यक्ष भगवान् श्रीकृष्ण सांगणार आणि अर्जुनासारखा प्रेमळ भक्त श्रवण करणार मग त्या ज्ञानाची थोरवी ती काय वर्णावी? अर्जुन ह्मणजे खरें पाहिलें तर भक्तीचा केवळ पुतळाच ह्मटलें तरी चालेल. आणि ह्मणूनच परमेश्वरांनीं जीवापेक्षांही प्रिय गुह्याहुन ही गुह्य असें अध्यात्मज्ञान त्यास निवेदन केलें, "मुठ्यातून धान्य काढलें आणि तें तयार केलेल्या जमिनीत पेरलें तर तें सांडासांडींत गेलें असें ह्मणतां येईल काय?" त्याचप्रमाणें, "प्रशस्त अंतःकरणाचा, शुद्धबुद्धीचा, निंदा न करणारा व निष्ठावंत असा जो कोणी असेल त्याच्यापाशीं कसलेंही गुह्य सांगितलें तरी त्याचा सत्पात्रींच व्यय झाला असें ह्मणावें लागतें. परमात्म्यांनीं अर्जुनास जें गुह्यज्ञान निवेदन

केलें तें सर्वप्रकारचे ज्ञानांत श्रेष्ठतम असें आहे. " त्याला सकल गुह्यांचे स्वामी, पवित्रांतील राजा, धर्माचें माहेरघर, उत्तमाहून उत्तम अशा अनेक उपमा दिल्या तरी त्याचें यथातथ्य वर्णन होणें कठीणच. तें प्राप्त झालें असतां जन्म मरणाचा फेरा चुकणार आहे!"

" हें तर काय, पण त्याच्या प्राप्तिच्या अगदीं आलीकडच्या सीमेवर जरी चित्त उभें राहिलें तरी तें सुखानें परिलुत होतें." तें हृदयांत स्वयंभु वास्तव्य करणारें आणि गुरूपदेशानें सहज प्राप्त होणारें असें आहे. त्यांतील दुसरा मुख्य गुण ह्मटला ह्मणजे हें एकदा प्राप्त झालें ह्मणजे त्याचा कधींही नाश न होतां उपभोगानें देखील तें कमी होत नाहीं. आतां कित्येक तर्कवादी अशी शंका काढतील कीं, हें ज्ञान जर अशा उच्चप्रकारचें असून थोड्याशाच प्रयत्नानें प्राप्त होणारें आहे तर सर्वत्रांनीं तें साध्य करून आपली सुटका करून घेतली नसती काय! तर बाबानों, ह्या आपणांसारख्या सामान्यजनांची स्थिती गाईच्या स्तनावरील गोचिडाप्रमाणें आहे. दूध हें पवित्र व गोड असून अगदीं नजीक ह्मणजे एका पदराच्या—त्वचेच्याच आड असताना तें टाकून तो रक्तच पिऊन राहतो. " त्याप्रमाणें सर्व सखाची विश्रांति असा आत्माराम हृदयांत असतां वेड्या लोकांना विषयाची इच्छा होते!" अहंममतेच्या गडबडींत बिचारे आपल्या सर्वसुखास आंचवतात." " बाकी परमात्मा नर ह्मणाल तर, जसा सूर्य तोंडासमोर असावा तसा आहे. तो जसा अमुक एके ठिकाणीं नाहीं, किंवा अमक्याला दिसत नाहीं तसा परमेश्वर दुर्लभ नाहीं." " त्याचें स्वरूप जिकडे तिकडे फैलावलें

आहे " ज्याप्रमाणें दूध थिजलें ह्मणजे तेंच दही किंवा बिज असतें, त्याचाच वृक्ष होतो, त्याप्रमाणें त्याचा एकाचाच जो हा विस्तार, तेंच जग " जें अदृश्यत्वानें थिजलेलें असतें, तेंच विश्वरूपानें वितळतें. ह्याप्रमाणेंच त्यानें निर्गुण असून सुगुणरूपानें ह्या त्रैलोक्याचा विस्तार केला आहे. महत्तत्वापासून देहापर्यंत, चटसारीं भूतें, पाण्यांत फेंस असल्याप्रमाणें त्याचेमध्यें प्रतिबिंबित झालीं आहेत. त्या फेसामध्यें पाहिलें असतां ज्याप्रमाणें पाणी दिसत नाहीं त्याप्रमाणेंच त्याची स्थिती होय. ह्मणून आपल्या दृष्टीचा प्रवेश त्याचे अंतर्यामी झाला ह्मणजे झालें.

**भक्तानामीश्वरे प्रेम तेषुतस्यापितत्तथा ।**
**इति गीतादिशास्त्रेषु हरिणैव प्रदर्शितम् ॥ १५४ ॥**

नित्य अनन्यभावानें भगवंताचें भजन करणारांवर परमेश्वराचें अकृत्रीम प्रेम असतें, आणि परमात्म्यानेंही उलट त्यांचेवर त्याच मासल्याचें प्रेम असतें. तो सर्वांतरात्मा अखिल भूतमात्रांचे ठायीं वास करीत असूनही विशेषतः आपले भक्तजनाचे अंतर्यामी स्वरूपप्रकाश पूर्णपणें पाडीत असल्या कारणानें त्यांची त्याच्यावर अप्रतीम श्रद्धा बसलेली असते. त्याच प्रमाणें त्याची सर्वत्र जरी समदृष्टी असते तरी भक्त हे त्यास विशेष प्रिय वाटतात. ज्ञानी लोकांस आत्मत्वाचे योगेंकरून तो जरी गोचर होत असतो तरी त्यांची त्याजवर भक्ति नसल्या कारणानें त्यांचेसंबंधीं त्यास फारसें महत्व वाटत नाहीं. गीतेंत श्रीकृष्णपरमात्मा ह्मणतातः—

**" समोहं सर्व भूतेषु न मेद्वेष्योऽस्ति न प्रियः ।**

**ये भजंति तु मां भक्त्या मयिते तेषुचाप्यहम् ॥१॥"**

सर्व प्राणिमात्र मला सारखेच आहेत. अमुक ह्मणजे प्रिय व अमुक ह्मणजे अप्रिय अशांनला प्रकार बिलकूल नाहीं. माझे ठायीं आपपर भाव कसा तो वसतच नसतो; परतु पूर्ण भक्तिभावानें जे माझ्या चरणीं लागतात त्यांचेविषयींची मात्र गोष्ट वेगळी आहे. ते देहेंद्रियांची सर्व कर्मे आचरतात असे दिसतात खरे, पण त्यांचा तो प्रकार केवळ वरपांगी होय. माझ्या ठायीं ते व त्यांच्या ठायीं मी अशी स्थिती झालेली असते. 'वडाचा सारा विस्तार एका बीजाच्या दाण्यांत भरलेला असतो, आणि बीजाचा दाणा जसा वडांत राहतो तसें भक्तांच्या आणि माझ्यामध्यें बाहेरच्या नांवातच कायतें अंतर असतें. बाकी अंतरंगांतील स्थिति पहाल तर मी तेंच तें.' उसनवारीचे अलंकार आंगावर वापरणें जसें वरकरणी तसें त्याचें देहधारण केवळ उदासपणाचें होय." भागवतांतही ह्मटलें आहे.

**" साधवो हृदयं मह्यं साधूनां हृदयं त्वहम् ।**
**मदन्यंतेनजानान्ति नाहं तेभ्यो मनागपि । १ ।"**

" साधु लोक माझें हृदय होत व मीही त्यांचें हृदयच आहे. मज व्यतिरिक्त दुसरें ते कांहीं एक जाणत नाहींत, आणि मीही पण त्यांचे खेरीज दुसऱ्या कोणाबद्दलही काळजी करीत नाहीं."

**तथा गुह्यतरं ज्ञानं भक्तिर्गुह्यतमेतिच ।**
**तस्मादभिमता भक्तिर्हरेरित्यवगम्यते ॥ १५९ ॥**

ज्ञानयोग, कर्मयोग, व भक्तियोग हे मोक्षाचे तिन्ही

मार्ग परमात्म्यानींचे लावून दिलेले असून " भक्तिमार्ग चांगला, भक्तिमार्ग चांगला " असें सांगत सुटणें ह्मणजे केवळ पक्षाभिमान आहे असें कित्येकांस वाटण्याचा संभव आहे. पण मार्गे जें जें सांगितलें आहे तें तें सर्व साधार असून त्यांत पदरचें असें कांहीं एक नाहीं. हें सूक्ष्मविचाराअंतीं सूज्ञांस कळून येणारें आहे. ज्ञानमार्ग उत्तम आहे ही गोष्ट निर्विवाद आहे पण भक्ति मार्ग त्याहिपेक्षां कांहीं अंशांनीं अधिक उत्तम आहे. संन्यासयोग किंवा कर्मयोग यांजपेक्षां भक्तियोग गुह्यतर असा आहे; अर्थात भक्ति सर्वांहून गुह्यतम अशी आहे. गीतेंत श्रीकृष्ण परमात्मा भक्तश्रेष्ठ जो अर्जुन यास सांगावयाचें तेवढें सर्व ज्ञान सांगून सरतेशेवटीं मुख्य मुद्याची गोष्ट ह्मणून सांगतातः—

" इति ते ज्ञानमाख्यातं गुह्याद्गुह्यतरं मया ।
विमृश्यैतदशेषेण यथेच्छसि तथा कुरु ॥ १ ॥
सर्वगुह्यतमं भूयः श्रृणु मे परमं वचः ।
इष्टोऽसि मे दृढमिति ततो वक्ष्यामि ते हितम् । २ । "

" हे अर्जुना ! सर्व वेदांचें सारभूत असें गीताशास्त्र मी तुला कथन केलें. त्याच्या साह्यानें आत्म्यासारखें रत्न हस्तगत होणारें आहे. त्यांतील एक एक तत्त्वावर नीट शोधक बुद्धीनें विचार केला पाहिजे. अशा विचारानें मनाचा पूर्ण निश्चय झाला ह्मणजे मग पाहिजे तें करावें. असो. आतां तुला सांगावयाचें असें एकच राहिलें आहे. तें इतकें गुह्य आहे कीं, तें एकदां समजलें ह्मणजे बाकीचीं कितीही गुह्य असलेलीं तत्त्वें त्यापुढें अगदीं तुच्छ अशीं वाटतात. तर आतां आणखी एकवेळ मी जें सांगतों तें नीट लक्ष देऊन श्रवण

कर. तूं केवळ माझ्या जिवाचा कलिजा आहेस ह्मणून तुजवर ही एवढी कृपा होत आहे असें समज. " कासवांच्या पिलांचा पान्हा दृष्टीतूनच फुटतो " तद्वतच मी आपली तुजवरची निस्सीम प्रीति सदुपदेशाचेद्वारें व्यक्त करीत आहे. तर तूंही गृहण करण्यास आपलें चित्त सावधान ठेव.

" मन्मना भव मद्भक्तो मद्याजी मां नमस्कुरु ।
मामेवैष्यसि सत्यं ते प्रतिजाने प्रियोऽसिमे ॥ १ ॥
सर्वधर्मान्परित्यज्य मामेकं शरणं व्रज ।
अहं त्वां सर्व पापेभ्यो मोक्षयिष्यामि माशुच ॥ २ ॥ "

" हे धनंजया तूं आपले कायीक, वाचीक, मानसीक, सर्वप्रकारचे व्यापार सोडून देऊन केवळ मजवरच अनुरक्त होऊन रहा, तूं आपलें मन माझ्या ठिकाणीं वतन करून ठेव. माझें पूजन-अर्चन हेच तुझे यज्ञयाग असें समज. मी सर्वत्र सारखा भरून उरलेला आहे अशी तुझी दृढ भावना झाली पाहिजे. अंतर्यामीं वसत असलेला प्राणिमात्राचा द्वेष नाहींसा होऊन ' सर्वत्र मीच एक आहे असें समजून ' नमस्कार, नमस्कार ' असें करशील तेव्हांच तूं माझ्या दृढतर आश्रयास पात्र होशील. मग साऱ्या भरलेल्या, जगामध्यें तिसऱ्याची गोष्टही न उरतां, तुह्मांला आह्मांलाच एकांत होऊन राहील; आणि तिसरा मध्यंतरींचा अडथळा नाहींसा झाला ह्मणजे बाकी राहणार तें 'मीच' ह्मणून शेवटीं तूं मलाच पावशील" एवढ्या करितां धर्माधर्माची सर्व भीती या ज्ञानाच्या योगानें नाहींशी करून एक मला शरण आलास ह्मणजे झालें." मग ताकापासून काढलेलें लोणी, फिरून

ताकांत घातेलें तर तें कांहीं केलें तरी जसें ताकरूप होत नाहीं त्याचप्रमाणें अद्वयपणानें मला तूं शरण आलास म्हणजे अर्थातच तुला धर्माची किंवा अधर्माची गरज म्हणून राहणार नाहीं. "लोखंड उभें असलें तर माती खातें, पण तें परिसाच्या सहवासानें एकदां सुवर्ण झालें म्हणजे मग त्यास मळ शिवतही नाहीं." "त्याचप्रमाणें तूं एकदां मद्रूप झालास म्हणजे तुझें पाप आणि पुण्य मीच होईन." पाण्यांत मीठ पडलें तर सारेंच पाणी होऊन जातें, तद्वतच तूं मला अनन्यभावें शरण आलास म्हणजे तसाच मजमध्यें मिळून जाशील. या करतां मला आपलासा करून घे. म्हणजे मी तुला या दुस्तर संसारसागरांतून सहजच मुक्त करीन.

"मी त्याचाच आहे तो, माझाच आहे" आणि "तो मीच आहे." अशा प्रकारच्या दास्य, प्रेम व ज्ञान या त्रयीच्या साह्यानें त्यास शरण गेलें म्हणजे मुक्त होण्यास तो काय वेळ!

---

## प्रकरण सतरावें.

# उपसंहार.

---

भक्तिकल्पलतामेनां श्रद्धया यः स्वचेतसि ।
धारयेच्छ्रीहरिस्तस्मिन् संतुष्येद्भक्तवत्सलः । १५६ ।

ही भगवत्प्रेमबीजापासून, उत्पन्न होणारी स्वानंदफळ

दात्री भक्तिकल्पलता आपल्या आश्रितजनाचे सर्व प्रकारें मनोरथ परिपूर्ण करणारी अशी आहे. अंतःकरणाचे ठायीं दृढ विश्वास वागवून जे पुरुष या ग्रंथांत कथन केलेल्या गोष्टींवर नीट मनन करतील, त्यांचेवर तो षड्गुणैश्वर्यसंपन्न श्री कृष्णपरमात्मा कृपा केल्याशिवाय कधींही राहणार नाहीं. त्यास भक्तवत्सल हें नामाभिधान कांहीं उगीच पडलें नाहीं. गायीची आपल्या तान्हेलेल्या वासरावर जितकी माया असते तितकी किंबहुना त्याहून अधीक माया तो आपल्या भक्तांविषयीं बाळगितो. त्याची अनन्यगतिक चित्तानें जे भक्ति करतात त्यांना कोणत्याँही गोष्टींची वाण न पडतां मोक्षप्राप्त्यर्थ देखील अन्य साधनांची अपेक्षा करावी लागत नाहीं.

“ यत्कर्मभिर्यत्तपसा ज्ञानवैराग्यतश्चयत् ।
योगेन दानधर्मेण श्रेयोभिरितरैरपि ॥ १ ॥”
सर्वं मद्भक्ति योगेन मद्भक्तो लभतेऽञ्जसा ।”

असें स्पष्ट भगवद्वचनच आहे. कर्माचरण, यज्ञयाग, ज्ञानवैराग्य किंवा दानधर्म यांपासून प्राप्त होणारीं सर्व फळें एकट्या भक्तियोगाचे आश्रयानें सहजच मिळूं शकतात.

तपो योग क्रीयादीनामन्वी क्षिक्याश्रमौलिषु ।
विराजते यस्य भक्तिस्तस्मै श्रीहरयेनमः ॥ १८७॥

म्हणून अष्टांगयोग, कृच्छ्रचांद्रायणादि तपें, श्रौतस्मार्तादि क्रियाकर्मे किंवा ब्रह्मविद्या याचे शिरोभागीं ज्याची एकनिष्ठभावानें केलेली भक्ति एकाद्या दैदीप्यमान रत्नाप्रमाणें

शोभा देत असते त्या षड्गुणैश्वर्यसंपन्न, भक्तकामकल्पद्रुम श्रीहरीला माझा विनयपूर्वक प्रणिपात असो. अनन्यभावानें त्याचे पदकमलीं लोटांगण घातल्याशिवाय आपणास ती भगवद्भक्ति प्राप्त तरी कशी व्हावी? आणि तिजवर तर सर्व प्रकारचीं मोक्षसाधनें पूर्णपणें अवलंबून आहेत. श्रीमद्भागवतांतच ह्मटलें आहे:—

"वर्णाश्रमवतां धर्म एष आचार लक्षणः।
स एव मद्भक्तियुतो निःश्रेयसकरः परः॥ १॥
धर्मः सत्यदयोपेतो विद्या वा तपसान्विता।
मद्भक्त्यापेत मात्मानं न सम्यक् प्रपुनाति हि॥२॥"

आपापल्या वर्णाश्रमधर्माप्रमाणें केलेलीं कर्मे ईश्वराचे ठायीं दृढ भक्ति ठेवून आचरलीं तरच त्यांपासून मोक्षप्राप्ति वगैरे इष्ट हेतु सिद्ध होणारे आहेत. सत्य, दया यांनीं युक्त आणि मोठा विद्वान असा एखादा पुरुष आहे पण त्याचे अंगीं जर भक्तीचा लेशही नाहीं तर त्याची ती सर्व विद्या आणि तो सर्व धर्म असून नसून व्यर्थ आहे. सारांश. ब्रह्मविद्या किंवा यज्ञयाग आदिकरून सर्व मोक्षसाधनें भगवद्भक्तीवांचून लंगडीं पडतात. शिवाय भक्ति परमात्म्यास जशी प्रिय होते तसें ज्ञान वगैरे दुसरें कांहीं ही त्यास इतकें प्रिय होत नाहीं. ह्मणून सर्व मोक्षसाधनामध्यें भक्तिमार्गास जें शिरोमणित्व दिलें आहे तें योग्यच आहे असें ह्मटलें पाहिजे.

येन मे प्रेरिताबुद्धि भक्तिमाहात्म्यवर्णने।
स देवः प्रीयतां कृष्णोयः सतां हृदिराजते॥ १९८॥

सरतेशेवटीं ज्या जगच्चालकानें हें भक्तिमाहात्म्य वर्णन करण्याची माझे अंतर्यामी प्रेरणा केली त्या सच्चिदानंद प्रभूचा मजदीनावर कृपाकटाक्ष असावा अशी करद्वय जोडून विनयपूर्वक प्रार्थना आहे. तो सर्वांतर्यामी भगवान् सर्वत्र सारखा पसरला असल्या कारणानें साधुसंतांची निराळी प्रार्थना करण्याची गरजच उरली नाहीं ह्मणून पुन्हां एकदां प्रार्थना आहे कीं:—

श्रीकृष्णपरमानन्द शरणागत वत्सल।
भक्तिस्तेचरणाम्भोजे ह्यचलामेऽस्तुसर्वदा ॥१५९॥

हे ब्रह्मांडनायका! भक्तवत्सल प्रभो! तुझ्या चरणरजांची सेवा मजदीनाकडून सदासर्वदां घडावी. त्यांत अंतर असें कधींच पडतां कामा नये.

## ॥ इति श्रीभक्तिकल्पलता संपूर्णा ॥

॥ श्री कृष्णार्पणमस्तु ॥

इति कौशिक गौत्रोत्पन्न अनंत सूनु दत्तात्रय
विरचितया सुदर्शनाख्यया व्याख्यया
समेतं सद्गुरु श्री चंडिराम स्वा-
मिकृता भक्तिलतेयं
संपूर्णा!

समाप्त.